# महाराष्ट्र विधानपरिषद
# चौथे (हिवाळी) अधिवेशन, २०१७

## अतारांकित प्रश्नोत्तरांची यादी
## प्रश्नांची एकूण संख्या - ५०

### नागपूर विभागातील मूल्यांकनास अपात्र असलेल्या विनाअनुदानित माध्यमिक शाळांना मिळणाऱ्या अनुदानामध्ये भ्रष्टाचार झाल्याबाबत

**(१) १०७८ (२१-०१-२०१५). श्री.नागोराव गाणार, प्रा.अनिल सोले :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) नागपूर विभागातील नागपूर जिल्हयातील ११ शाळा, गडचिरोली जिल्हयातील २४ शाळा, चंद्रपूर जिल्हयातील १ शाळा, गोंदिया जिल्हयातील ९ विना अनुदानित माध्यमिक शाळांचे मुल्यांकन करुन त्या अनुदानासाठी पात्र नसताना या शाळांची अनुदान मिळण्यासाठी त्या त्या जिल्हयाच्या शिक्षणाधिकाऱ्यांनी शिक्षण संचालक, पुणे यांचेकडे सन २०१२-१३ व २०१३-१४ या वर्षात शिफारस केली, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, शिक्षण संचालक माध्यमिक पुणे यांचे कार्यालयात सदरहू प्रस्तावांची छाननी करुन त्या अनुदानास अपात्र असल्याचे कारण देऊन सदरहू प्रस्ताव शिक्षण उपसंचालक, नागपूर विभाग यांचेकडे शिक्षण संचालकांनी दिनांक २१ फेब्रुवारी, २०१४ रोजी परत पाठविले, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, मुल्यांकनात अपात्र असलेल्या शाळांना पात्र ठरवून त्या शाळांचे प्रस्ताव अनुदान मिळण्यासाठी शिक्षण संचालक, पुणे यांचेकडे पाठविण्यात आले त्यामुळे या संपूर्ण प्रकारात मोठ्या प्रमाणात भ्रष्टाचार झाला असल्याची शक्यता निर्माण झाली आहे,
(४) अपात्र शाळांना कोणत्या निकषावर पात्र ठरवून अनुदानासाठी शिफारस करण्यात आली,
(५) उपरोक्त ह्या प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय,
(६) असल्यास, नागपूर विभागातील दोषी असलेल्या शिक्षणाधिकारी माध्यमिक यांचेविरुध्द कोणती कारवाई करण्यात येत आहे ?

**श्री. विनोद तावडे (२५-०९-२०१७) :** (१) व (२) प्रस्तावावरील त्रुटी पूर्ण करुन मूल्यांकनाच्या निकषानुसार पात्र ठरलेल्या शाळांचे प्रस्ताव शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक) यांचेकडे सादर करण्यात आले.
(३), (४), (५) व (६) प्रश्न उद्भवत नाही.

---

## मालाड, मुंबई येथील कुरार व्हिलेज मधील बांधकाम सुरु असलेल्या ४२ मजले टॉवरला आग लागल्याबाबत

**(२) ५३६५ (१०-०४-२०१५). श्रीमती विद्या चव्हाण :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) मालाड (मुंबई) येथील कुरार व्हिलेज मधील बांधकाम सुरू असलेल्या ४२ मजले टॉवर इमारतीच्या सर्वात वरच्या मजल्यावर दिनांक १६ जानेवारी, २०१५ रोजी वा त्यासुमारास रात्री आग लागली होती, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, मुंबई अग्निशमन दलाची शिडी २३ मजल्या पर्यंत पोहचते त्यामुळे सदर आग विझवण्याकरिता साडे सात तास लागले, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, मुंबई अग्निशमन दलाने या इमारतीच्या प्रकल्पाला आणि संबंधीत इमारत प्रस्तावाला विभागाने दिलेल्या परवानगीची चौकशी शासनामार्फत केली आहे काय,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. देवेंद्र फडणवीस (१२-०९-२०१७) :** (१) मालाड येथील कुरार व्हिलेजमधील बांधकाम सुरु असलेल्या तळमजला + ८ पोडीअम + स्टील्ट + काही भाग ३४ माळयांचा + काही भाग ३७ माळयांच्या इमारतीच्या सर्वात वरच्या माळयाला दिनांक १७ जानेवारी, २०१५ रोजी रात्रौ ००.०४ वाजता आग लागली होती ही वस्तुस्थिती आहे.

(२) मुंबई अग्निशमन दलाकडे सध्या उपलब्ध असलेली सर्वात उंच शिडी ही २३ व्या मजल्यापर्यंत पोहचते हे खरे आहे.

उंच शिडयांचा उपयोग हा अशा प्रकारच्या उत्तुंग इमारतींमधील आग विझविण्याकरिता अतिरिक्त मदत करण्यासाठी असतो. सदर उत्तुंग इमारतींमध्ये आग विझविण्याकरिता मुख्यत: इमारतींमध्ये बसविण्यात आलेल्या अंतर्गत अग्निशमन यंत्रणेचा वापर केला जातो.

सदर इमारतीचे बांधकाम सुरु असल्यामुळे इमारतीत अग्निप्रतिबंधक व अग्निनियंत्रण यंत्रणा अस्तित्वात नव्हती.

(३) सदर इमारतीच्या प्रस्तावाला बृहन्मुंबई महानगरपालिकेच्या अग्निशमन दलाने ना-हरकत प्रमाणपत्र दिले असून, अंतिम परवाना एस.आर.ए. विभागामार्फत देण्यात आला आहे.

(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## मुंबई महानगरपालिका क्षेत्रात फेरीवाल्यांसाठी तयार केलेल्या धोरणाबाबत

**(३) १५७१३ (२९-०४-२०१६). श्रीमती विद्या चव्हाण, श्री.नरेंद्र पाटील, श्री.सुनिल तटकरे, श्री.हेमंत टकले, श्री.अनिल भोसले, श्री.ख्वाजा बेग, श्री.प्रकाश गजभिये, श्री.किरण पावसकर, श्री.विक्रम काळे :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मा.सर्वोच्च न्यायालयाने दिलेल्या आदेशानुसार मुंबई महानगरपालिका क्षेत्रात फेरीवाल्यांसाठी तयार केलेल्या धोरणाबाबतचा प्रस्ताव महानगरपालिकेने शासनाला सादर केला आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदर प्रस्तावाचे स्वरुप व तपशिल काय आहे, सदर प्रस्तावास शासनाने मंजुरी दिली आहे काय,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. देवेंद्र फडणवीस (१६-०९-२०१७) :** (१), (२) व (३) केंद्र शासनाने दिनांक १ मे, २०१४ पासून पथविक्रेता (उपजिविका संरक्षण आणि पथविक्रीचे विनियमन) अधिनियम २०१४ लागू केला आहे.

सदर अधिनियमातील कलम ३६(१) नुसार राज्य शासनाने महाराष्ट्र पथविक्रेता (उपजिविका संरक्षण व पथविक्री विनियमन) (महाराष्ट्र) नियम २०१६, दिनांक ३ ऑगस्ट, २०१६ रोजी नियमावली व कलम ३८(१) नुसार दिनांक ९ जानेवारी, २०१७ रोजी पथविक्रेता (उपजिविकेचे संरक्षण व पथविक्री विनियमन) २०१७ योजना प्रसिध्द केली आहे.

सदर योजनेतील तरतुदीनुसार महानगरपालिकेमार्फत पुढील कार्यवाही करण्यात येत आहे.

---

## राज्यात नवीन वाळू लिलाव धोरणांची अंमलबजावणी करण्याबाबत

**(४) २०६९३ (१६-०८-२०१६). श्रीमती हुस्नबानू खलिफे, श्री.रामहरी रुपनवर, श्री.संजय दत्त :** सन्माननीय **महसूल मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यात गत वर्षात निर्माण झालेला वाळू माफियांवर कायमचा तोडगा काढण्यासाठी शासन नवीन वाळू लिलाव धोरणाची अंमलबजावणी करणार असून, त्यामुळे मुबलक प्रमाणात वाळू उपलब्ध होईल, महसूल मिळेल व वाळूमाफिया संपुष्टात येईल अशी माहिती मा.महसूल मंत्री यांनी दिली असल्याचे माहे एप्रिल, २०१६ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदर धोरणाची अंमलबजावणी करण्याबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची करणे काय आहेत ?

**श्री. चंद्रकांत पाटील (११-०९-२०१७) :** (१), (२) व (३) राज्यातील वाळू/रेती निर्गतीसाठी सुधारीत धोरण तयार करावयाची कार्यवाही शासन स्तरावर सुरू आहे.

---

## राज्यात प्रादेशिक परिवहन कार्यालयात (आरटीओ) येथे चाचणी ट्रॅक उभारण्याबाबत

**(५) २४०६२ (३०-१२-२०१६). श्री.हेमंत टकले, श्री.किरण पावसकर, श्री.नरेंद्र पाटील, प्रा.जोगेन्द्र कवाडे, श्री.रामराव वडकुते, श्री.सतिश चव्हाण, ॲड.निरंजन डावखरे, श्रीमती विद्या चव्हाण, प्रा.अनिल सोले, श्री.मितेश भांगडिया :** सन्माननीय **परिवहन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) प्रादेशिक परिवहन कार्यालयांमध्ये (आरटीओ) फिटनेस चाचणीसाठी येणाऱ्या गाड्यांची चाचणी घेण्यासाठी ट्रॅक उपलब्ध करुन देण्याबाबतचे आदेश मा.उच्च न्यायालयाने दिलेले असतांनाही ट्रॅककरिता जागा उपलब्ध झाली नसल्याचे माहे ऑक्टोबर, २०१६ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, मध्यमुंबई प्रादेशिक परिवहन कार्यालयामार्फत वाहनाच्या फिटनेस चाचणीसाठी २५० मीटरचे टॅक उभारणीसाठी आयुक्त, परिवहन यांचेकडे वरळी डेअरी येथील जागेचा प्रस्ताव माहे सप्टेंबर २०१६ मध्ये वा त्यादरम्यान पाठविला आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, आरटीओकडे चाचणी मार्गच उपलब्ध नसल्याने कोणत्याही चाचणीविना फिटनेस प्रमाणपत्र दिले जात आहे, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करून चाचणी ट्रॅककरिता जागा उपलब्ध करुन देण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. दिवाकर रावते (१६-०९-२०१७) :** (१) व (२) होय.

(३) मा.उच्च न्यायालयाने २५० मीटरचे ब्रेक टेस्ट ट्रॅक उपलब्ध होईपर्यंत सध्या चालू असणाऱ्या कार्यपध्दतीनुसार वाहनांची ब्रेक चाचणी घेण्यासाठी सध्या कार्यालयीन आवारामध्ये अथवा कार्यालगतच्या कमी रहदारीच्या रस्त्यावर वाहनांच्या ब्रेक व इतर बाबींची तपासणी केली जाते व तद्नंतरच वाहनांना फिटनेस प्रमाणपत्र दिले जाते.

(४) संबंधित प्रादेशिक/उप प्रादेशिक परिवहन अधिकारी कार्यालयाच्या स्तरावरुन या कामी लागणारी जागा संपादित करण्याची कार्यवाही चालू आहे.
(५) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

**कल्याण-डोंबिवली महानगरपालिकेची रुग्णालये शासनाकडे हस्तांतरित करून घेण्याबाबत**

**(६) २४३९९ (०४-०१-२०१७). श्री.जगन्नाथ शिंदे :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) शासनाने अंबरनाथ नगरपरिषदेचे छाया रुग्णालय व इचलकरंजी येथील इंदिरा गांधी मेमोरियल रुग्णालय अनुक्रमे दिनांक १८ ऑक्टोबर, २०१६ व ३० जून, २०१६ रोजी वा त्यासुमारास हस्तांतरित करून घेऊन मिरा-भाईंदर महापालिकेचे टेंभा रुग्णालय नजीकच्या काळात सार्वजनिक आरोग्य विभागाकडे हस्तांतरित करून घेण्यात येणार आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, कल्याण-डोंबिवली महापालिकेच्या महासभेने ठराव करून महापालिकेच्या रुक्मिणीबाई व शास्त्रीनगर रुग्णालये शासनाकडे हस्तांतरित करून घेण्याबाबतचा प्रस्ताव मागील तीन ते चार वर्षापूर्वीच सादर केलेला आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, कल्याण-डोंबिवली महापालिकेच्या रूग्णालय हस्तांतरणाबाबत सार्वजनिक आरोग्य विभागाने असमर्थता दर्शविली होती, हे ही खरे आहे काय,
(४) असल्यास, त्याची सर्वसाधारण कारणे काय आहेत ?

**श्री. देवेंद्र फडणवीस (२१-०९-२०१७) :** (१) अंबरनाथ नगरपरिषदेचे कै.बी.जी.छाया हॉस्पिटल दिनांक १७/११/२०१६ व इचलकरंजी नगरपरिषदेचे इंदिरा गांधी मेमोरियल हॉस्पिटल दिनांक ३०/०६/२००१६, तर मिरा-भाईंदर महानगरपालिकेचे भारतरत्न पंडित भीमसेन जोशी रुग्णालय (टेंबा रुग्णालय) दिनांक ३०/११/२०१६ रोजी शासनाच्या सार्वजनिक आरोग्य विभागाकडे हस्तांतरीत करण्यात आली आहेत.

(२) हे खरे आहे.

(३) व (४) कल्याण-डोंबिवली महानगरपालिकेची रुक्मिणीबाई रुग्णालय, कल्याण (प.) व शास्त्रीनगर रुग्णालय, डोंबिवली (प.) ही रुग्णालये शासनाकडे हस्तांतरीत करण्याबाबतची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

---

## राज्यात शाळाबाह्य मुलांचे सर्वेक्षण करण्याबाबत

**(७) २५७२४ (१६-१२-२०१६). श्रीमती विद्या चव्हाण, श्री.किरण पावसकर, श्री.हेमंत टकले : तारांकित प्रश्न क्रमांक १६६४२ ला दिनांक २२ मार्च, २०१६ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) शाळाबाह्य मुलांचे सर्वेक्षण आणि त्यांना शाळेत दाखल करण्याचे काम माहे डिसेंबर, २०१५ ते जानेवारी, २०१६ पर्यंत चालणे, उशिरा दाखल मुले-मुलांचे शैक्षणिक वर्ष वाया जाणे, त्यापैकी किती मुले वर्गात पोहचली यांची नोंद नसणे इत्यादी गोष्टी दिनांक १७ ऑगस्ट, २०१६ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आल्या आहेत, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, त्यात काय आढळून आले व तद्नुसार कोणती कार्यवाही करण्यात आली वा येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. विनोद तावडे (१६-०९-२०१७) :** (१) अंशत: खरे आहे.

(२) शासन पत्र क्र. संकीर्ण-२०१६/प्र.क्र.५७/एस.डी.४, दिनांक ९ डिसेंबर, २०१६ अन्वये सर्व क्षेत्रिय अधिकाऱ्यांना माहे जानेवारी, २०१७ ते फेब्रुवारी, २०१७ या कालावधीत आपापल्या जिल्हयातील सर्व शाळाबाहय मुलांचा सर्च करुन त्यांना शिक्षणाच्या मुख्य प्रवाहात दाखल करण्याबाबत व सर्व मुलांची नोंद सरल प्रणालीत करण्याबाबत निदेश देण्यात आले आहेत.

(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## मुंबईतील वर्ड ट्रेड सेंटर या इमारतीतील भाडेकरुनी केलेल्या तक्रारीनुसार कार्यवाही करण्याबाबत

**(८) २६७३७ (१३-०४-२०१७). श्री.शरद रणपिसे :** सन्माननीय **महसूल मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मुंबईतील वर्ड ट्रेड सेंटर या इमारतीचा भूखंड क्र.६३९ एम. विश्वेश्वरय्या इंडस्ट्रीयल रिसर्च आणि डेव्हलपमेंट सेंटर या संस्थेला दिनांक १८ नोव्हेंबर, १९७४ रोजी करार करुन शासनाने भाडेपट्टयाने दिलेला असून त्यानंतर वेळोवेळी आदेश काढून अनेक अटी घातल्या होत्या, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, संस्थेविरुध्द इमारतीतील भाडेकरुंच्या असोसिएशनने माहे सप्टेंबर, २०१६ मध्ये वा त्यादरम्यान शासनाकडे तक्रारी केल्या होत्या व त्यानुसार जिल्हाधिकारी, मुंबई यांनी सुनावणी घेतली होती, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उक्त संस्थेला किती क्षेत्रफळाचा भूखंड भाडेकराराने दिलेला होता, त्यासाठी कोणत्या अटी व शर्ती घातलेल्या होत्या व भाडेकरुंच्या असोसिएशनने कोणत्या तक्रारी शासनाकडे केलेल्या आहेत,

(४) असल्यास, यासंदर्भात घेण्यात आलेल्या सुनावणीत काय आढळून आले व तद्नुसार कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. चंद्रकांत पाटील (१४-०९-२०१७) :** (१), (२) व (३) शासनाने दिनांक १६/१०/१९७० च्या आदेशान्वये ६ हे. ९६.४९ आर क्षेत्रफळाची पुन:प्रापित शासकीय जमीन एम.विश्वेश्वरय्या औद्योगिक संशोधन व विकसन केंद्राला भाडेपट्टयाने दिली होती. तद्नंतर दिनांक १८/११/१९७४ च्या शासननिर्णयान्वये पूर्वी निर्गमित केलेले सर्व आदेश अधिक्रमित करून एकुण ७१०७१ चौ.मी. क्षेत्रफळाची शासकीय जमीन उक्त संस्थेस भाडेपट्टयाने देण्याचा निर्णय घेण्यात आला. त्यापैकी शासनाच्या दिनांक १६/४/१९७९ च्या आदेशान्वये २३०४६ चौ.मी. जमीन शासनाने परत घेतली. सद्य:स्थितीत एम.विश्वेश्वरय्या औद्योगिक संशोधन व विकसन केंद्र यांचेकडे ४८०२५ चौ.मी. इतकी शासकीय जमीन आहे. सदर शासकीय जमीन भाडेपट्टयाने देताना ती प्रामुख्याने खालील अटी व शर्तींच्या अधिन राहून दिली आहे :-

१) सदर शासकीय जमिनीचा भाडेपट्टा हा ९९ वर्षासाठी असेल. तद्नंतर त्याचे नुतनीकरण करता येईल.

२) सेंटरने एकूण मिळणाऱ्या उत्पन्नामधून संस्थेच्या व्यवस्थापनावर व इतर आवश्यक बाबींवर तसेच विविध कर अदा करण्यासाठी होणारा खर्च वजा जाता जे निव्वळ उत्पन्न मिळेल त्या उत्पन्नाच्या ५०% रक्कम शासनास अदा करावी लागेल.

३) रुपये ३२५/- प्रति चौ. मी. या दराने येणाऱ्या एकूण जमिनीच्या किंमतीच्या ६.५०% या दराने भुईभाडे दरवर्षी आकारण्यात येईल.

४) शासनाच्या परवानगीशिवाय सदरहू जमीन किंवा तिचा कोणताही भाग गहाण ठेवता येणार नाही किंवा हस्तांतरित करता येणार नाही.

५) जमीन मंजूर करण्याच्या शर्तीपैकी कोणत्याही शर्तीचा भंग झाल्यास भाडेपट्टा रद्द करुन कोणत्याही भरपाईशिवाय जमीन परत घेण्याचा शासनास अधिकार राहिल.

जागा प्रदान आदेशातील अटी व शर्तीचे उल्लंघन व जागेच्या वापराबाबत अनियमितता झालेची तक्रार सदर संस्थेच्या भाडेकरुंच्या असोशिएशन यांनी केली होती. जिल्हाधिकारी मुंबई शहर यांच्या स्तरावरील याबाबतच्या सुनावणीमध्ये भाडेपट्टामधील अटी व शर्तीचे भंग झालेचे आढळून आले.

(४) जिल्हाधिकाऱ्यांच्या स्तरावरील सुनावणीमध्ये जागा प्रदान आदेशातील अटी व शर्तीचे उल्लंघन तसेच जागेच्या वापराबाबत अनियमितता झालेचे आढळून आल्याने जिल्हाधिकारी कार्यालयाने दिनांक २४/११/२०१६ च्या आदेशान्वये जागा शासनाच्या ताब्यात घेण्याबाबत आदेश दिले होते. या विरुध्द एम.विश्वेश्वरय्या औद्योगिक संशोधन व विकसन केंद्र यांनी मा.उच्च न्यायालयात दावा दाखल केला. जिल्हाधिकारी, मुंबई शहर यांच्या आदेशास मा.उच्च न्यायालयाने स्थगिती दिली व मा.उच्च न्यायालयाच्या निर्देशानुसार सद्य:स्थितीत सदर प्रकरण महाराष्ट्र महसूल न्यायाधिकरणात दाखल आहे.

(५) सद्या प्रकरण न्यायप्रविष्ठ आहे.

## केईएम व सायन रुग्णालयात अद्ययावत बर्न वॉर्ड सुरु करण्याबाबत

**(९) २७४०५ (१३-०४-२०१७). श्री.नरेंद्र पाटील, श्री.धनंजय मुंडे, श्री.हेमंत टकले, श्री.किरण पावसकर, श्री.जयवंतराव जाधव, श्री.अमरसिंह पंडित, ॲड.निरंजन डावखरे, श्रीमती विद्या चव्हाण, श्री.अनिल भोसले : तारांकित प्रश्न क्रमांक ७१८० ला दिनांक २९ जुलै, २०१५ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मुंबई येथील केईएम व सायन रुग्णालयात अद्ययावत बर्न वॉर्ड सुरु करण्याचा तसेच एअर ॲम्ब्युलन्स सुरु करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, विचाराधीन बाबीवरील शासनाचा निर्णय पूर्ण झाला आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करून कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. देवेंद्र फडणवीस (१४-०९-२०१७) :** (१), (२) व (३) बृहन्मुंबई महानगरपालिकेच्या के.ई.एम. रुग्णालयात सुघटन शास्त्र (Plastic Surgery) विभाग असून, त्यामध्ये महिला व लहान मुलांकरीता १२ रुग्णशय्या (बर्न वॉर्ड) आहेत.

सायन रुग्णालयात १६ रुग्णशय्या (बर्न वॉर्ड) आहेत.

तथापि, एअर ॲम्ब्युलन्स सुरु करण्याची बाब बृहन्मुंबई महानगरपालिकेच्या विचाराधीन नाही.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## मुंबईत फेरीवाल्यांसंदर्भात नवीन धोरण राबविण्याबाबत

**(१०) २७६७१ (१३-०४-२०१७). श्री.रामराव वडकुते, श्री.धनंजय मुंडे, ॲड.निरंजन डावखरे, श्री.हेमंत टकले, श्री.किरण पावसकर, श्री.नरेंद्र पाटील, श्री.अनिल भोसले, ॲड.जयदेव गायकवाड, श्री.सुनिल तटकरे, श्री.ख्वाजा बेग,**

**श्री.जयवंतराव जाधव, श्री.अमरसिंह पंडित, श्रीमती विद्या चव्हाण, अ‍ॅड.अनिल परब, श्री.रविंद्र फाटक :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मुंबईत फेरीवाल्यांचे लोंढे येवू नये यासाठी शासनाने नवीन धोरण राबविण्याचा निर्णय माहे जानेवारी, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान घेतला आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदर निर्णयानुसार शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. देवेंद्र फडणवीस (११-०९-२०१७) :** (१), (२) व (३) केंद्र शासनाने दिनांक १ मे, २०१४ पासून पथविक्रेता (उपजीविका संरक्षण आणि पथविक्रीचे विनियमन) अधिनियम २०१४ लागू केला आहे.

सदर अधिनियमातील कलम ३६(१) नुसार राज्य शासनाने महाराष्ट्र पथविक्रेता (उपजीविका संरक्षण व पथविक्री विनियमन) (महाराष्ट्र) नियम २०१६, दिनांक ३ ऑगस्ट, २०१६ रोजी नियमावली व कलम ३८(१) नुसार दिनांक ९ जानेवारी, २०१७ रोजी पथविक्रेता (उपजीविकेचे संरक्षण व पथविक्री विनियमन) २०१७ योजना प्रसिध्द केली आहे.

सदर योजनेतील तरतुदीनुसार महानगरपालिकेमार्फत पुढील कार्यवाही करण्यात येत आहे.

---

## मिरा-भाईंदर महानगरपालिकेच्या आरक्षित जागेवर सेव्हन इलेव्हन हे खाजगी रुग्णालय बांधल्याबाबत

**(११) २७८५३ (१७-०४-२०१७). श्रीमती विद्या चव्हाण, श्री.जयवंतराव जाधव, अ‍ॅड.निरंजन डावखरे, श्री.नरेंद्र पाटील :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मिरा-भाईंदर महानगरपालिका परिसरातील तलाठी सज्जा नवघर यातील महानगरपालिकेचे प्राथमिक आरोग्य केंद्र व प्रसूती गृह या आरक्षणावर

महानगरपालिकेने सन २०११ मध्ये सेव्हन इलेव्हन या खाजगी रुग्णालयास प्रारंभ पत्र देते वेळी या रुग्णालयाच्या मालकांकडून महानगरपालिकेस महानगरपालिकेचे प्राथमिक आरोग्य केंद्र, प्रसूती गृहाचे दहा हजार चौ.मी. चे बांधकाम तयार करुन महानगरपालिकेस सुपुर्द करावयाची अट घातलेली आहे असे असताना या विकासकानी त्या अटीची पुर्तता केलेली नसताना सुध्दा महानगरपालिकेचा अग्निशमन विभाग, सार्वजनिक वैद्यकीय आरोग्य विभाग यांनी या रुग्णालयास ना-हरकती देणे, पाणीपुरवठा नळ जोडणी देणे, कर विभागाने कर लावणे, उपरोक्त प्रारंभ पत्राचे पालन न केल्या कारणास्तव नगरविकास विभागाने सदर प्रारंभ पत्र रद्द न करणे याबाबत श्री. मिलन वसंत म्हात्रे यांनी सन २०१५-२०१६ या कालावधीत शासनाच्या नगरविकास व नगररचना विभागाकडे करण्यात आलेल्या लेखी तक्रारीवर शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(२) असल्यास, उपरोक्त प्रकरणी प्रथम दर्शनी दोषी ठरणाऱ्या महानगरपालिकेच्या अधिकाऱ्यांवर कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. देवेंद्र फडणवीस (२१-०९-२०१७) :** (१) मे.सेव्हन इलेव्हन कन्स्ट्रक्शन प्रा.लि. यांना आरक्षण क्र.२१७ “डिस्पेन्सरी ॲन्ड मेटरनिटी होम” हे आरक्षण विकसित करण्यासाठी समावेशक आरक्षणाच्या तरतूदीन्वये २५% बांधकाम क्षेत्र महानगरपालिकेस विनामुल्य हस्तांतरीत करण्याच्या अटीवर परवानगी देण्यात आलेली आहे. परंतु २५% इतके बांधीव क्षेत्र महानगरपालिकेस अद्यापपर्यंत हस्तांतरीत करण्यात आलेले नाही.

सेव्हन इलेव्हन रुग्णालयाच्या ४ मजल्यापैकी केवळ तळ + १ मजल्याकरीता भाग अंतिम ना हरकत दाखला देण्यात आला आहे. तथापि, सदर इमारतीसाठी अद्याप भोगवटा दाखला देण्यात आलेला नाही.

या खाजगी रुग्णालयास महानगरपालिकेमार्फत १ इंचाच्या ४ नळ जोडण्या प्रचलित धोरणानुसार देण्यात आल्या आहेत.

सेव्हन इलेव्हन रुग्णालय या मालमत्तेचा वापर सुरु असल्याचे निदर्शनास आल्याने विभागीय कर निरीक्षक यांनी संबंधितांना कर

आकारणीसाठी आवश्यक कागदपत्रे सादर करण्यास कळविण्यात आले होते. सेव्हन इलेव्हन रुग्णालयाकडून कर आकारणीबाबतचा अर्ज प्राप्त झाला असून त्यानुसार त्यांच्याकडून प्राप्त कागदपत्रे व मोकळ्या जागेवरील कर भरणा तपासणी करुन कर आकारणी करण्याचे महानगरपालिकेकडून प्रस्तावित आहे.

उक्त प्रकरणी श्री.मिलन म्हात्रे यांनी शासनास सादर केलेल्या तक्रारींच्या अनुषंगाने आयुक्त, मिरा-भाईंदर महानगरपालिका यांच्याकडून अहवाल मागविण्यात आला असून त्याबाबत त्यांना स्मरणही करुन देण्यात आले आहे.

(२) व (३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

**मुंबई महानगरपालिकेने क्रिडांगणे आणि उद्यांनासाठी आरक्षित असलेले भुखंड विकासकांना दिल्याबाबत**

**(१२) २७८५९ (१७-०४-२०१७). श्रीमती विद्या चव्हाण, श्री.नरेंद्र पाटील, श्री.जयवंतराव जाधव :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मुंबई महानगरपालिकेने क्रिडांगणे आणि उद्यांनासाठी आरक्षित असलेले अनेक भुखंड विकासकाना दिनांक १ जानेवारी, २००० ते ३१ डिसेंबर, २०१६ या १६ वर्षात दिले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, असे कोणते भुखंड किती चौरस मीटरचे आहेत व कोणकोणत्या विकासकाला दिले आहेत,

(३) असल्यास, कोणत्या वर्षात दिले आणि प्रत्येक भुखंडाची रेडी रेकनर प्रमाणे किमंत काय आहे,

(४) असल्यास, दिलेला प्रत्येक भुखंड कोणत्या नियमाप्रमाणे विकासकांना देण्यात आलेला आहे ?

**श्री. देवेंद्र फडणवीस (२१-०९-२०१७) :** (१) बृहन्मुंबई महानगरपालिकेने क्रिडांगणे आणि उद्यानांसाठी आरक्षित असलेला कोणताही भूखंड विकासकाला दिलेला नाही.

(२), (३) व (४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## क्राय व स्नेहा या स्वयंसेवी संस्थांनी केलेल्या सर्वेक्षणाबाबत

**(१३) २७९३४ (१३-०४-२०१७). ॲड.अनिल परब, श्री.हेमंत टकले, श्री.किरण पावसकर, श्री.नरेंद्र पाटील, श्रीमती विद्या चव्हाण, ॲड.जयदेव गायकवाड, श्री.अनिल भोसले, श्रीमती स्मिता वाघ :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) योग्य वेळेवर तसेच सर्वसामान्यांना परवडणाऱ्या आरोग्य सेवेचा अभाव, स्तनपान किंवा पुरक आहाराची कमी गुणवत्ता अशा विविध कारणांनी कॉस्मॉपॉलिटीन सिटी म्हणून ओळख असलेल्या मुंबईतील लाखो बालके लुकडेपणाच्या (वेस्टिंग) विळख्यात सापडल्याचे नुकतेच क्राय व स्नेहा या स्वयंसेवी संस्थांनी केलेल्या सर्वेक्षणातून आढळून आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदरहू आजार नियंत्रणात आणण्यासाठी कोणताही विशेष निधी उपलब्ध नसल्याचेही निदर्शनास आले आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, सदर प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, त्यात काय आढळून आले, तदनुसार यास आळा बसण्याकरिता शासनस्तरावर कोणती उपाययोजना केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. देवेंद्र फडणवीस (११-०९-२०१७) :** (१) क्राय व स्नेहा या संस्थांनी केलेल्या सर्वेक्षणाचा अहवाल एकात्मिक बाल विकास सेवा योजना कार्यालयास प्राप्त झालेला नाही.

एकात्मिक बाल विकास सेवा योजनेंतर्गत अंगणवाडीतील सर्वसाधारण श्रेणीतील बालकांना दररोज ५०० उष्मांक आणि १२ ते १५ ग्रॅम प्रथिने असलेला आहार देण्यात येतो.

तीव्र कमी वजनाच्या बालकांना दररोज ८०० उष्मांक आणि २० ते २५ ग्रॅम प्रथिने असलेला आहार देण्यात येतो.

तसेच, नवसंजीवन क्षेत्रातील बालकांना प्रतिदिन प्रतिलाभार्थी ९५० कॅलरी व २३ ग्रॅम असलेला आहार पुरविण्यात येतो.

(२) व (३) एकात्मिक बाल विकास सेवा योजना या कार्यालयास पोषण आहार

पुरवठयासाठी सन २०१७-१८ मध्ये निधी प्राप्त झाला आहे.

तसेच, दिनांक २०/०७/२०१७ रोजीच्या शासन निर्णयान्वये केंद्र शासनाचे पुरक पोषण आहाराचे सुधारीत दर दिनांक ०१/०४/२०१७ पासून लागू करण्यात आले आहेत.

एकात्मिक बाल विकास सेवा योजनेंतर्गत सर्वसाधारण श्रेणीतील बालकांना प्रतिबालक दररोज रु. ६/-, तीव्र कमी वजनाच्या बालकांना रु. ९/- व गरोदर/स्तनदा माता यांना रु. ७/- इतक्या किंमतीचा आहार देण्यात येतो.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

**मालेगांव (जि.नाशिक) महानगरपालिका हद्दीतील नाला ठिकठिकाणी नष्ट होत असल्याबाबत**

**(१४) २७९९८ (१७-०४-२०१७). डॉ.अपूर्व हिरे :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मालेगांव (जि.नाशिक) महानगरपालिका हद्दीतील गिरणा नदी किनारी असलेल्या संगमेश्वर शिवारातील तसेच दाभाडी सटाणा रोडवरील लोंढा नाला ठिकठिकाणी भराव टाकून बुजविल्याने अतिक्रमण व ग्रीन झोन असुनही थाटण्यात आलेले व्यवसाय यामुळे नष्ट होत असल्याचे दिनांक ११ एप्रिल, २०१६ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, गिरणा पुल, मालेगांव लगत असलेल्या लोंढा नालाची रुंदी १०० ते १२५ मीटर असुनही त्यावर मातीचा भराव करुन अतिक्रमण करण्यात आल्याने त्याची रुंदी आता १५ ते २० फुट इतकीही राहिलेली नाही तसेच दाभाडी सटाणा रोडवरील नाला बुजवून, भराव टाकून त्यावर अतिक्रमण करण्यात आल्याचेही निदर्शनास आले आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, वर्षानुवर्ष अस्तित्व असलेल्या लोंढा नाल्याचा ठिकठिकाणी नैसर्गिक प्रवाह मार्ग रोखण्यात आल्याने या नाल्यातून पावसाळ्यात वाहून जाणाऱ्या पाण्यास मोठा अडथळा निर्माण झाला असून त्यामुळे सोयगांव, कलेक्टर पट्टा भागात पावसाचे प्रचंड प्रमाणात पाणी तुंबण्याचा धोका निर्माण झाला आहे, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, महापालिका हद्दीतील ठिकठिकाणी असलेले नाले बुजविणे व

त्यावरील अतिक्रमण प्रकरणी आयुक्त, मालेगांव महानगरपालिका, प्रांतधिकारी व तहसिलदार, मालेगांव यांचेकडे तक्रार दाखल करुनही याप्रकरणी कार्यवाही करण्यात आलेली नाही, हे ही खरे आहे काय,
(५) असल्यास, याप्रकरणी संबधितांविरुद्ध कारवाई न होण्याचे कारण काय आहे व सदरहू नाले पुर्ववत करणे संबधीची कार्यवाही केव्हापर्यंत होणे अपेक्षित आहे.?

**श्री. देवेंद्र फडणवीस (०८-०९-२०१७) :** (१), (२) व (३) हे खरे नाही.

मालेगाव महानगरपालिका हद्दीतील संगमेश्वर शिवार, गिरणा पुल या भागातील नाला व दाभाडी-सटाणा रोडवरील लोंढा नाल्यावर कोणत्याही प्रकारचे अतिक्रमण झाल्याचे निदर्शनास आले नाही.

तसेच वरील नाल्यांबाबत नाला बुजविणे, नाल्यावरील अतिक्रमण किंवा पावसाळ्यात पाणी तुंबण्याबाबतची तक्रार महानगरपालिकेकडे प्राप्त झालेली नाही.

(४) मालेगाव महानगरपालिका हद्दीतील गोशाळा पांजरापोळ या संस्थेच्या पुर्व दिशेला शासकीय जागेवर असलेला नैसर्गिक नाला बुजविण्यात येत असल्याबाबत संस्थेने उपविभागीय अधिकारी, मालेगाव यांचेकडे दावा दाखल केला होता.

सदर दाव्याप्रकरणी उपविभागीय अधिकारी, मालेगाव यांनी दिनांक १३.०६.२०१७ रोजी आदेश पारित करुन, सदर नाला बुजविण्याचे काम तात्काळ बंद करुन नाला पुर्ववत करण्याचे निर्देश मालेगाव महानगरपालिकेस देण्यात आले आहेत.

(५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## कल्याण (जि.ठाणे) शहरातून वाहणाऱ्या वालधुनी नदीच्या संरक्षण व संवर्धनासाठी निधी उपलब्ध करणेबाबत

**(१५) २८१२८ (१३-०४-२०१७). श्री.जगन्नाथ शिंदे, ॲड. निरंजन वसंत डावखरे : तारांकित प्रश्न क्रमांक २४४०४ ला दिनांक ७ डिसेंबर, २०१६ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) कल्याण (जि.ठाणे) शहरातून वाहणाऱ्या वालधुनी नदी संरक्षण व संवर्धनासाठीचा सविस्तर प्रकल्प अहवाल जिल्हाधिकारी, ठाणे यांच्यामार्फत दिनांक १ ऑगस्ट, २०११ रोजी वा त्यासुमारास शासनास सादर केला आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, याच अहवालाच्या अनुषंगाने स्थानिक लोकप्रतिनिधींकडून सातत्याने याबाबत पाठपुरावा केला जात असून दिनांक १४ डिसेंबर, २०१६ रोजी वा त्यासुमारास मा.मुख्यमंत्री महोदयांना वालधुनी नदी संवर्धन आणि संरक्षणासाठी पुणे जिल्ह्यातील मुठा नदीच्या धर्तीवर केंद्र शासनाकडे निधीच्या उपलब्धतेचा प्रस्ताव सादर करण्याबाबत विनंती करणारे निवेदन सादर केले होते, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, सदरहू निवेदनाच्या अनुषंगाने केंद्र शासनाचा निधी उपलब्ध होण्यासाठी शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. देवेंद्र फडणवीस (२१-०९-२०१७) :** (१) व (२) हे खरे आहे.
(३) सदर निवेदनाच्या अनुषंगाने आयुक्त, कल्याण-डोंबिवली महानगरपालिका यांच्याकडून अभिप्राय प्राप्त झाले असून त्याबाबत पुढील कार्यवाही प्रस्तावित आहे.
(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## मुंबई महानगरपालिकेने विविध कामांचे सुमारे १२०० कोटी रुपयांचे प्रस्ताव मंजूर केल्याबाबत

**(१६) २८२८५ (१३-०४-२०१७). आर्कि.अनंत गाडगीळ :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) मुंबई महानगरपालिकेने विविध कामांचे सुमारे १२०० कोटी रुपयांचे प्रस्ताव एका आठवडयात मंजूर केल्यानंतर स्थायी समितीच्या बैठकीत दुसऱ्या आठवडयात आणखी १५०० कोटी रुपयांचे प्रस्ताव मार्गी लावण्यात आले आहेत, हे खरे आहे काय

(२) असल्यास, सदर समितीच्या अवघ्या ९० मिनीटाच्या बैठकीत ९७ प्रस्ताव मंजूर करण्यात आले आहेत, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, सदर प्रस्ताव घाईत मंजूर करण्यात आलेल्या प्रस्तावात त्रुटी राहण्याची शक्यता लक्षात घेता उक्त प्रस्तावांची चौकशी करुन त्यावर निर्णय घेणे आवश्यक असल्याने या मंजूर झालेल्या प्रस्तावाच्या मंजूरींचा फेरविचार करण्याबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. देवेंद्र फडणवीस (१४-०९-२०१७) :** (१) बृहन्मुंबई महानगरपालिका स्थायी समितीच्या बुधवार दिनांक २१ डिसेंबर, २०१६ रोजी भरलेल्या सभेमध्ये अंदाजे रुपये ९८६ कोटी इतक्या कंत्राट रकमेचे प्रस्ताव मंजुर करण्यात आले. तसेच बुधवार, दिनांक २८ डिसेंबर, २०१६ रोजी भरलेल्या सभेमध्ये (दोन तहकुब सभांसहित) अंदाजे रुपये १२३० कोटी इतक्या कंत्राट रकमेचे प्रस्ताव मंजूर झाले.
(२) व (३) बृहन्मुंबई महानगरपालिका स्थायी समितीच्या बुधवार, दिनांक २१ डिसेंबर, २०१६ रोजी भरलेली सभा, दुपारी २.०० वाजता सुरू होऊन दुपारी ३.२२ वाजता संपली आणि बुधवार दिनांक २८ डिसेंबर, २०१६ रोजी भरलेली सभा दुपारी २.०० वाजता सुरु होऊन दुपारी ४.०५ वाजता संपली.

स्थायी समितीच्या सभांचे कामकाज हे नियमानुसार पार पाडले जाते.
(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## मुंबई शहरात घुसखोर बांगलादेशींना राहण्यासाठी स्थानिक नागरिकांचाच आधार मिळत असल्याबाबत

**(१७) २९२२६ (१३-०४-२०१७). श्री.जनार्दन चांदूरकर :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) मुंबई शहरात घुसखोर बांगलादेशींना राहण्यासाठी स्थानिक नागरिकांचाच आधार मिळत असून महानगरपालिकेच्या सॅप प्रणालीतील जन्म नोंदणीत फेरफार केल्याचा प्रकार माहे डिसेंबर, २०१६ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास

आला आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उपरोक्त प्रकरणी महानगरपालिकेच्या काही अधिकाऱ्यांनी मदत केल्याचा पोलिसांचा संशय आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करून कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. देवेंद्र फडणवीस (१५-०९-२०१७) :** (१) व (२) होय.
(३) सदर प्रकरणी शिवाजी नगर पोलीस ठाणे येथे गु.र.क्र.५३९/२०१६, भादंवि कलम ४६५, ४६७, ४६८, ४७१, ४२०, ३४ सह, पारपत्र कायदा कलम १२, सह आधार कायदा कलम ३४ व ४०, सह लोकप्रतिनिधी अधिनियम कलम ३१ अन्वये गुन्हा दाखल करण्यात आला असून पुढील तपास चालु आहे.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

### ढोकी (ता.पांढरकवडा, जि.यवतमाळ) येथील गट क्रमांक ४१/१ हे. आर. ६.८७ या सामायिक मालकीच्या शेतातील मातीचे उत्खनन होत असल्याबाबत

**(१८) २९२७१ (१३-०४-२०१७). श्री.ख्वाजा बेग, श्री.हेमंत टकले, श्री.आनंद ठाकूर :** सन्माननीय **महसूल मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) ढोकी (ता.पांढरकवडा, जि.यवतमाळ) येथील गट क्रमांक ४१/१ हे. आर. ६.८७ या सामायिक मालकीच्या शेतातील मातीचे उत्खनन करुन ती माती वीटभट्टीसाठी घेऊन जात असल्याबाबतची तक्रार शेतमालक यांनी तहसिलदार, पांढरकवडा यांच्याकडे माहे जानेवारी, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान केली आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व तद्नुसार दोषींवर कोणती कारवाई केली वा करण्यांत येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. चंद्रकांत पाटील (११-०९-२०१७) :** (१) अशी बाब निदर्शनास आलेली नाही. (२) व (३) प्रश्न उद्‍भवत नाही.

---

## विविध बनावट उत्पादनांची विक्री करणाऱ्या टेलीशॉपिंग कंपन्यांच्या विरोधात कारवाई करणेबाबत

**(१९) २९३०१ (१३-०४-२०१७). श्री.रविंद्र फाटक, श्री.जयंत पाटील :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) टीव्हीवरील जाहिराती व इंटरनेटच्या माध्यमातून विविध बनावट उत्पादनांची विक्री करुन ग्राहकांची फसवणूक करणाऱ्या टेलीशॉपिंग कंपन्यांच्या विरोधात गेल्या वर्षभरात ठाणे येथे सुमारे ४५ तर राज्यात ९८३ तक्रारी पोलीस ठाण्यात दाखल झाल्याचे माहे जानेवारी, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, बहुतांश टेलीशॉपिंग कंपन्यांचे जाळे हे ठाणे परिसरात विस्तारल्याचे निदर्शनास आले आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, सदर तक्रारींचा तपास सायबर क्राईम सेलकडे सोपवण्यात आला आहे, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, उक्त प्रकरणी सायबर क्राईम सेलने कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. देवेंद्र फडणवीस (१५-०९-२०१७) :** (१) हे अंशत: खरे आहे.

सदरहू प्रकरणी मुंबई व ठाणे अखत्यारीतील पोलीस घटकांची माहिती निरंक आहे.

तसेच राज्यात पोलीस आयुक्त, पुणे शहर/नागपूर शहर आणि पोलीस अधिक्षक, अमरावती ग्रा./वर्धा यांच्या कार्यक्षेत्रात खालील प्रमाणे गुन्हे दाखल करण्यात आलेले आहेत.

१) पोलीस आयुक्त, पुणे शहर येथे मार्केटयार्ड पो.स्टे.येथे गुरनं २०५/२०१६

भा.दं.वि. कलम ४२०, ४१९, ३४ माहिती तंत्रज्ञान कायदा कलम ६६ प्रमाणे गुन्हा दाखल करण्यात आला आहे. सदर गुन्ह्यात ०३ आरोपी निष्पन्न झाले आहेत.

२) पोलीस आयुक्त, नागपूर शहरात दोन गुन्हे पुढीलप्रमाणे दाखल आहे -

१. अंबाझरी पो.स्टे. येथे गु.र.क्र. १८८/१६ भा.दं.वि. कलम ४२०, ४०६, ३४ प्रमाणे गुन्हा दाखल करण्यात आला आहे. सदर गुन्ह्यात ०५ आरोपी निष्पन्न झाले आहेत.

२. लकडगंज पो.स्टे. अप.क्र. २५२/१६ भादंवि कलम ४२०, माहिती तंत्रज्ञान कायदा ६६-ड प्रमाणे गुन्हा दाखल करण्यात आला आहे. सदर गुन्ह्यात ०१ आरोपी निष्पन्न झाला आहे.

३. पोलीस अधिक्षक, अमरावती ग्रामीण येथे माहुली पो.स्टे. गु.र.क्र. १५२/१७, कलम ४२०, ५०७ भा.दं.वि. सह कलम ६६-सी, ६६-डी आय-टी ॲक्टप्रमाणे गुन्हा दाखल करण्यात आला आहे. सदर गुन्हयात ०१ आरोपी निष्पन्न झाला असून, सदर गुन्हा तपासावर आहे.

४. पोलीस अधिक्षक, वर्धा येथे तळेगांव पो.स्टे.गु.र.क्र. १७१/१७ कलम ४२०, ४६८, ३४ भा.दं.वि. प्रमाणे गुन्हा दाखल करण्यात आला असून सदरचा गुन्हा तपासावर आहे.

(२) नाही.

(३) सदर प्रकरणी पोलीस आयुक्त, पुणे शहर वगळता टेलीशॉपिंग बाबत उपरोक्त नमूद घटकांतील दाखल गुन्ह्यांचा तपास सायबर सेल मार्फतीने करण्यात येत आहे.

(४) सदर गुन्ह्याच्या तपासात फिर्यादी, आरोपी यांचे मोबाईल सीडीआर/एसडीआर प्राप्त करण्याची आणि फिर्यादीने आरोपीच्या ज्या बँक खात्यात रक्कम जमा केली त्या खात्याची केवायसी, स्टेटमेंट व संपूर्ण विवरण प्राप्त करण्यात येवून, पुढील तपास चालू आहे.

(५) प्रश्न उद्भवत नाही.

---

**भडगांव (जि.जळगांव) तालुक्यातील दलवाडे शिवारातील गिरणा नदीच्या वाळू लिलावास ग्रामस्थांनी विरोध केल्याबाबत**

**(२०) २९६०९ (१५-०४-२०१७). श्रीमती स्मिता वाघ :** सन्माननीय **महसूल मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) भडगांव (जि.जळगांव) तालुक्यातील दलवाडे शिवारातील गिरणा नदीच्या वाळू लिलावास ग्रामस्थांनी विरोध केला असून त्याबाबतचे निवेदन निवासी नायब तहसिलदार, भडगांव यांना माहे जानेवारी, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान दिले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करून कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहे ?

**श्री. चंद्रकांत पाटील (११-०९-२०१७) :** (१) व (२) भडगाव तालुक्यातील मौजे गोंडगाव व दलवाडे येथील ग्रामस्थांकडून मौजे दलवाडे येथील वाळूगटाचा लिलाव रद्द करण्याबाबत प्राप्त झालेल्या निवेदनाच्या अनुषंगाने, शासन निर्णय दिनांक १२/०३/२०१३ अन्वये, विहित केलेल्या वाळू/रेती निर्गती धोरणातील तरतुदीनुसार जिल्हास्तरीय समितीने सुनावणी घेऊन, सदर वाळूगटाचा लिलाव रद्द करण्याचा निर्णय घेतला आहे.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

**ठाणे जिल्हयात बेकादयेशीरपणे रेतीचे उत्खनन करणाऱ्यांवर एमपीडीए कायद्यानुसार कारवाई करण्याबाबत**

**(२१) ३००४७ (१५-०४-२०१७). श्री.हेमंत टकले, श्री.सुनिल तटकरे, श्री.विक्रम काळे, श्री.सतिश चव्हाण :** सन्माननीय **महसूल मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) ठाणे जिल्हयात बेकायदेशीरपणे रेतीचे उत्खनन तसेच वाहतूक करणाऱ्या रेतीमाफियांवर एमपीडीए कायद्यानुसार गुन्हे दाखल करण्याचा निर्णय शासनाने माहे फेब्रुवारी, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान घेतला आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासन निर्णयाची अंमलबजावणी करून एमपीडीए कायद्यानुसार किती व्यक्तींवर कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. चंद्रकांत पाटील (११-०९-२०१७) :** (१) व (२) उपविभागीय अधिकारी कल्याण यांनी दिनांक १७/०२/२०१७ च्या पत्रान्वये पोलीस उपायुक्त परिमंडळ कल्याण-३ यांना अनिधिकृत गौण खनिज गुन्हे प्रकरणात वारंवार आढळणाऱ्या इसमांवर एम.पी.डी.ए. कायद्यांतर्गत कारवाई करण्याबाबत कळविण्यात आले असून, रेतीच्या अवैध उत्खनन व वाहतुक प्रकरणी एम.पी.डी.ए. कायद्यानुसार अद्याप कारवाई करण्यात आलेली नाही.
(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## विलेपार्ले (पूर्व) हनुमान रोड (मुंबई) येथील निष्कासित करण्यात आलेले स्टॉल पुन्हा बसविण्याबाबत

**(२२) ३०८७० (१३-०४-२०१७). श्रीमती विद्या चव्हाण :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) विलेपार्ले (पूर्व), हनुमान रोड (मुंबई) श्रीजी दर्शन इमारतीलगतचे २० ते ४० वर्ष जुने ६ स्टॉल, पथविक्रेता (उपजिवीका संरक्षण व पथविक्री विनियमन) नियम, २०१४ अंतर्गत संरक्षित असताना निष्कासित करण्यात आले असून शासन निर्णय बी.एम.सी./२५१६/प्र.क्र.१५१९/२०१६ नवि-२, ह्या दिनांक ९ जानेवारी, २०१७ च्या अध्यादेशान्वये उक्त स्टॉल पुन्हा बसविण्यात यावेत यासाठी लोकप्रतिनिधीनी दिनांक ४ फेब्रुवारी, २०१७ रोजी वा त्यासुमारास निवेदनाद्वारे मागणी केली आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, निवेदनातील मागण्याचे स्वरुप काय आहे, तद्नुसार शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. देवेंद्र फडणवीस (११-०९-२०१७) :** (१) व (२) ४० वर्षे जुन्या बायाघर, सध्याचे श्रीजी दर्शन, प्लॉट नं. ८८, सी.टी.एस. नं. ६७६ लगत हनुमान रोड, विलेपार्ले (पूर्व) येथील निष्कासित करण्यात आलेल्या ६ स्टॉलधारकांचे त्याच ठिकाणी पुनर्वसन करण्याबाबत निवेदनाद्वारे विनंती करण्यात आली आहे ही वस्तुस्थिती आहे.

सदर स्टॉलधारकांकडे मुंबई महानगरपालिका अधिनियम १८८८ च्या कलम ३१३ (अ)(ब) अन्वये फेरीवाला अनुज्ञापत्र/परवाना दिल्याचे आढळून आले नाही. तसेच, सदर स्टॉल्स वाहतुकीस व पादचाऱ्यांना अडथळा ठरत असल्याने महानगरपालिकेमार्फत निष्कासित करण्यात आले होते.

तथापि, पथविक्रेता (उपजीविकेचे संरक्षण व पथविक्री विनियमन) योजना-२०१७ अन्वये निष्कासित स्टॉलधारकांचे पुनर्वसन करणे शक्य नाही.
(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

**मुंबईतील बेस्ट उपक्रमाच्या ए.सी. बसेस लिलावात काढण्याचा निर्णयाबाबत**

**(२३) ३०८९२ (११-०८-२०१७). श्री.धनंजय मुंडे, श्री.जयवंतराव जाधव, श्री.सुनिल तटकरे, श्री.हेमंत टकले, ॲड.निरंजन डावखरे, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.संजय दत्त, श्री.रामहरी रुपनवर, श्री.शरद रणपिसे, श्री.जनार्दन चांदूरकर :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) मुंबईतील बेस्ट उपक्रमाच्या सुमारे २६६ ए.सी. बसेस दिनांक १० एप्रिल, २०१७ रोजी वा त्यासुमारास लिलावात काढण्याचा निर्णय घेण्यात आला आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, या बसचे खरेदी मुल्य रुपये ५० ते ६० लाख असून त्यांची विक्री कमी किंमतीने करण्याचे प्रस्तावित आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, या ए.सी. बसचे एकूण खरेदीमुल्य नेमके किती होते व विक्री मुल्य किती अपेक्षित आहे,
(४) असल्यास, मुंबईकरांना आवश्यक असलेली चांगल्या दर्जाची सेवा ए.सी. बसेसच्या माध्यमातून पुरविण्यास अपयश आल्याने प्रवाशांनी पाठ फिरवली आहे, हे खरे आहे काय,

(५) असल्यास, या ए.सी. बसेसला पर्यायी कोणती व्यवस्था देण्यात येत आहे?

**श्री. देवेंद्र फडणवीस (१९-०९-२०१७) :** (१) व (२) हे खरे नाही.

बेस्ट उपक्रमाच्या वातानुकूलीत बसगाडया लिलावात काढण्याचा निर्णय बेस्ट प्रशासनाने घेतलेला नाही.

(३) बेस्ट उपक्रमाच्या वातानुकूलीत बसगाडयांपैकी २१२ बसगाडया सन २००९ साली उपक्रमाने जेसीबीएल लि. या संस्थेकडून प्रत्येकी रु. ६८,३१,२८०.७१ इतक्या किंमतीला खरेदी केल्या होत्या.

सदर बसगाडया लिलावामध्ये विकण्याचा निर्णय झालेला नसल्यामुळे त्याचे विक्रीमूल्य निश्चित करण्यात आलेले नाही.

(४) बेस्ट उपक्रमाने प्रवाशांना चांगल्या दर्जाची वातानुकूलीत बससेवा देण्याचा प्रयत्न केला. परंतु खाजगी वाहनांनी प्रवास करणारा प्रवासी त्याच्या निवासस्थानापासून कार्यालयाच्या प्रवेशद्वारापर्यंत थेट प्रवास करु शकतो.

बेस्ट उपक्रमाच्या बसगाडया अरुंद रस्त्यांवरुन प्रवर्तित करणे शक्य नसल्यामुळे खाजगी वाहनधारकांना उपक्रमाच्या वातानुकूलीत बससेवांकडे आकर्षित करणे सहज साध्य झाले नाही.

मुंबई लगतच्या शहरांमधील महापालिका परिवहन सेवांनी बेस्ट उपक्रमाच्या वातानुकूलीत बसमार्गांवर समांतर बससेवा तुलनेने कमी प्रवास भाडयात प्रवाशांकरिता उपलब्ध करुन करुन दिली.

त्यामुळे प्रवाशांची विभागणी होऊन उपक्रमाच्या प्रवासी संख्येत घट झाली.

(५) ज्या वातानुकूलीत बसमार्गांवर बससेवा देण्यात येत होती, त्यापैकी बहुतांश बसमार्गांवर समांतर प्रवर्तित होणारे सर्वसाधारण बससेवेचे बसमार्ग उपलब्ध आहेत.

---

## मुंबईतील सांताक्रुझ विमान प्राधिकरणाकडून अनधिकृतपणे प्रवाशांकडून टोलवसूली होत असल्याबाबत

**(२४) ३१०३६ (११-०८-२०१७). श्री.संजय दत्त, श्री.शरद रणपिसे, श्री.रामहरी रुपनवर :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मुंबईतील सांताक्रुझ विमान प्राधिकरणाकडून आंतरराष्ट्रीय व राष्ट्रीय विमान प्रवेशद्वारावर अनधिकृतपणे प्रवाशांकडून रुपये १३०/- टोल घेत असल्याचे माहे मे, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, प्रवाशांकडून विमान प्राधिकरणाकडून अनधिकृतपणे टोल वसुली सुरु केली आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, त्यात काय आढळून आले व तद्नुसार विमान प्राधिकरणाकडून होत असलेली अनधिकृत टोल वसूली बंद करण्याबाबत तसेच या प्रकरणातील दोषींवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. देवेंद्र फडणवीस (११-०९-२०१७) :** (१) व (२) नाही.

विमानतळांच्या प्रवेशद्वारावर विमानप्रवास तिकीटधारक प्रवाशांकडून कुठलाही अनधिकृत टोल घेतला जात नाही. वाहनतळासाठी वेळेनुसार चार्ज घेतला जातो.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## नाशिक जिल्हयातील ब्रिटीशकालीन व सुरक्षा कालावधी संपलेल्या पुलावरील वाहतुक बंद करून पर्यायी उपाययोजना करण्याबाबत

**(२५) ३१२६३ (०७-०८-२०१७). डॉ.अपूर्व हिरे : तारांकित प्रश्न क्रमांक २७८३० ला दिनांक २४ मार्च, २०१७ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम वगळून) मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) नाशिक जिल्ह्यातील ब्रिटीशकालीन व सुरक्षा कालावधी संपलेल्या मुंबई-आग्रा महामार्ग गोदावरी नदीवरील कन्नमवार पुलाच्या पुनर्बांधणीची केंद्र शासनामार्फत सुरु असलेली निविदा प्रक्रिया पुर्ण झाली आहे काय तसेच मुंबई महामार्गावर असलेला व वाहतुकीस धोकादायक ठरलेल्या व सद्य:स्थितीत वापरात असलेल्या कन्नमवार पुलाच्या पुनर्बांधणीबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(२) असल्यास, नाशिक जिल्ह्यातील कमकुवत पुलांची माहिती सार्वजनिक बांधकाम विभागाने वर्षभरानंतरही जिल्हा प्रशासनास सादर न केल्याने जिल्हाधिकारी, नाशिक यांनी प्रस्तुत विभागास अल्टिमेटम दिल्याचे दिनांक ३१ मे, २०१७ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, मागील वर्षी सावित्री नदीवरील पुल कोसळल्याच्या दुर्घटनेच्या पार्श्वभुमीवर सर्वच जुन्या पुलाचे लेखापरिक्षण (स्ट्रक्चरल ऑडीट) पुर्ण करून धोकादायक पुलावरील वाहतुक बंद करावी, असे आदेश मा.मुख्यमंत्री महोदयांनी दिनांक ३१ मे, २०१७ रोजी वा त्यासुमारास मुंबई येथे मान्सुन पुर्व आढावा बैठकीत दिले, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, शासन व जिल्हा प्रशासनाकडून पुरेशी खबरदारी घेतली जात असतांनाही, कमकुवत पुलांची माहिती प्रशासनास सादर न होणे, गोदावरी वरील सायखेडा येथील जुना पुल खचल्याने धोकादायक असुनही त्यावरून अवजड वाहतुक सुरु असणे, नांदुर मध्यमेश्वर धरणाच्या डाव्या कालव्यावरील ब्रिटीशकालीन पुल जीर्ण झाल्यामुळे पर्यायी व्यवस्थेसाठी केलेला कच्चा पुलही धोकादायक असणे तसेच घोटी येथील दारणा नदीवरील पुल इत्यादी व अन्य सुरक्षा कालावधी संपलेले जीर्ण, कमकुवत पुलांचे लेखापरिक्षण (स्ट्रक्चरल ऑडीट) करण्याबाबत शासनाने चौकशी करून सदर पुलावरील वाहतुक थांबवून पर्यायी उपाययोजना करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. चंद्रकांत पाटील (१८-०९-२०१७) :** (१) होय, पावसाळयानंतर कन्नमवार पूलाचे प्रत्यक्ष बांधकाम हाती घेण्यात येणार असल्याचे प्रकल्प संचालक, भारतीय राष्ट्रीय राजमार्ग प्राधिकरण, नाशिक यांनी कळविले आहे.

(२) हे खरे नाही, तथापि, नाशिक जिल्हयातील सार्वजनिक बांधकाम विभागाचे पुल कमकुवत झाल्याचे निदर्शनास आल्यास त्यावरील वाहतूक बंद करणे अथवा अन्यत्र वळविणे याबाबत जिल्हा प्रशासनास वेळोवेळी कळविण्यात येत असते.

(३) हे खरे नाही.

(४) सायखेडा ता.निफाड येथील गोदावरील नदीवरील कमकुवत पुलाची जून, २०१६ मध्ये तात्पुरती दुरस्ती करुन पुलावरुन अवजड वाहतूक बंद करण्यात आली आहे. तसेच जून, २०१७ मध्ये पुलाची कायम स्वरुपी दुरुस्ती हाती घेण्यात आली आहे.

घोटी सिन्नर मार्गावरील दारणा नदीवरील पुलाचा क्षतिग्रस्त डेक स्लॅबची दुरुस्ती पूर्ण करुन २ ऑगस्ट, २०१७ पासून पूल वेग मर्यादेत हलक्या वाहनांच्या वाहतुकीसाठी खुला करण्यात आला आहे. पुलाच्या दुरुस्तीचे काम प्रगतीत असल्याने सदरचा पुल अवजड वाहतुकीसाठी बंद करण्यात आलेला आहे.

(५) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## मुंबईतील कांदिवली (पश्चिम) येथील सरदार वल्लभभाई पटेल जलतरण तलावाचे काम प्रलंबित असल्याबाबत

**(२६) ३१५०५ (११-०८-२०१७). श्री.विजय ऊर्फ भाई गिरकर :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मुंबईतील कांदिवली (पश्चिम) येथील सरदार वल्लभभाई पटेल जलतरण तलाव हे मागील काही वर्षापासून बंद असल्याचे निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, महापालिका प्रशासनाने जलतरण तलाव, प्रशासकीय इमारत, जलगाळणी यंत्र, सुरक्षा भिंत पाडून येथे ऑलिम्पिक दर्जाचे जलतरण तलाव बांधण्याचा निर्णय घेण्यात आला आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, या जलतरण तलावाचा महापालिकेद्वारे आराखडा तयार करण्यात आला आहे काय,

(४) असल्यास, सदर जलतरण तलावाच्या बांधकामाकरिता महापालिकेद्वारे कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. देवेंद्र फडणवीस (१९-०९-२०१७) :** (१) मुंबई शहर आणि परिसरात २ वर्षांपूर्वी कमी पाऊस झाल्यामुळे तसेच जलाशयातील पाणी साठा कमी असल्यामुळे भविष्यकाळात पाण्याची अडचण उद्भवू नये याकरिता सदर जलतरण तलाव बंद ठेवण्यात आला होता.

सदर जलतरण तलावाचे पुनर्विकासाचे काम हाती घेतल्यामुळे काम पूर्ण होईपर्यंत सदर जलतरण तलाव जनतेच्या वापरासाठी बंद करण्यात आला आहे.
(२) हे खरे आहे.
(३) सदर जलतरण तलावाचे आराखडे बृहन्मुंबई महानगरपालिकेमार्फत तयार करण्यात आले आहेत.
(४) व (५) सदर जलतरण बांधण्यासाठी महानगरपालिकेमार्फत ई-निविदेद्वारे कंत्राटदाराची नियुक्ती करण्यात आली असून, दिनांक ३०/०६/२०१७ रोजी सदर कंत्राटदारास कार्यादेश देण्यात आला आहे.

---

## धुळे जिल्हा सरकारी वकिलाच्या नियमबाहय नियुक्तीबाबत

**(२७) ३१६३१ (११-०८-२०१७). श्रीमती विद्या चव्हाण, श्री.किरण पावसकर, श्री.जयवंतराव जाधव, श्री.हेमंत टकले, ॲड.राहुल नार्वेकर, ॲड.निरंजन डावखरे, श्री.धनंजय मुंडे, श्रीमती हुस्नबानू खलिफे :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) पात्र उमेदवाराला डावलुन धुळे जिल्हा सरकारी वकिलाची नियमबाहय नियुक्ती मा.मुंबई उच्च न्यायालयाच्या औरंगाबाद खंडपिठाने रद्द केल्याचे दिनांक ११ जून, २०१७ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, मा.उच्च न्यायालयाने नियुक्ती रद्द करण्याची कोणती कारणे दिली आहेत,

(३) असल्यास, उक्त सरकारी वकिल जैन यांना नियमबाहयपणे नियुक्ती देणाऱ्या अधिकाऱ्याची शासनाने चौकशी केली आहे काय, त्यात काय आढळुन आले आहे, तद्नुसार कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. देवेंद्र फडणवीस (१३-०९-२०१७) :** (१) मा.उच्च न्यायालय, मुंबई, खंडपीठ औरंगाबाद यांनी दिनांक ०६/०६/२०१७ रोजीच्या आदेशान्वये श्री. सुनिल जैन यांची जिल्हा सरकारी वकील, धुळे या पदावरील नियुक्ती रद्द केली आहे.
(२) मा.उच्च न्यायालयाने दिनांक ०६/०६/२०१७ रोजीच्या आदेशामध्ये नियुक्ती रद्द करण्याची कारणे न्यायनिर्णयात दिलेली आहेत.
(३) ॲड. जैन यांच्याबाबत मुलाखत समितीचे अभिप्राय शासनास प्राप्त झाल्यानंतर शासनाने त्यांची नियुक्ती जिल्हा सरकारी वकील पदावर नियुक्ती केली असल्याने संबंधित अधिकाऱ्यांवर कार्यवाही करण्याचा प्रश्न उद्भवत नाही.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

**नाशिक विमानतळावरून प्रवाशी विमान वाहतूक सेवा सुरु करणेबाबत**

**(२८) ३१७९२ (११-०८-२०१७). डॉ.अपूर्व हिरे, श्री. जयवंतराव जाधव, : तारांकित प्रश्न क्रमांक २४३४३ ला दिनांक १४ डिसेंबर, २०१६ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) केंद्र शासनाच्या उडान योजनेच्या माध्यमातून माहे जून, २०१७ पासून नाशिक-ओझर येथून प्रवाशी विमान वाहतुक सेवा सुरु करण्याचे प्रस्तावित करण्यात आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, राष्ट्रीय विमान वाहतुक धोरणांतर्गत शासनामार्फत “Regional Connectivity Scheme” योजना राबविण्यात येणार आहे, या योजनेंतर्गत राज्यातील विमानतळांचा विकास करण्याचे नियोजित असून त्यामध्ये नाशिक विमानतळाचा समावेश आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, या योजनेंतर्गत विमानतळ कार्यान्वित करणे अंतर्गत सेवाशुल्क, विमान सेवेचा प्रत्यक्ष खर्च व अपेक्षित महसुलातील तफावत दुर करणे याकरिता VGF (Viability Gap Funding) करण्याचे नियोजित असून यानिधीमध्ये केंद्र शासनाचा ८० टक्के व राज्य शासनाचा २० टक्के याप्रमाणे हिस्सा ठेवण्यात येणार आहे, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, राज्य शासनाने तीन वर्षापासून नाममात्र रकमेच्या भाडे करारावर नाशिक विमानतळाची सुसज्ज इमारत एचएएलकडे हस्तांतरीत केली, हे ही खरे आहे काय,

(५) असल्यास, नाशिक-ओझर येथील एचएएल विमानतळाची आशिया खंडातील सर्वात मोठी असलेली धावपट्टी, विमानसेवा सुरु करण्यासाठी एचएएलकडे असलेल्या सर्व तांत्रिक मान्यता विमानतळासाठी लागणाऱ्या सर्व सोयीसुविधा उपलब्ध असुनही नाशिक येथून प्रवाशी विमान वाहतुक सेवा सुरु न होण्याची कारणे काय आहेत,

(६) असल्यास, केंद्र व राज्य शासनाकडून नाशिक-ओझर येथून विमानसेवा सुरु केल्यास नाशिक, अहमदनगर, जळगांव, धुळे व नंदुरबार जिल्ह्यास होणारा फायदा व मुंबई विमानतळाचा पार्किंग समस्येचा कमी होणारा ताण, त्यामुळे मोठ्या प्रमाणात होणारी आर्थिक बचत इत्यादी बाबी विचारात घेता नाशिक येथून प्रवाशी विमान वाहतुक सेवा केव्हापासून सुरु होणे अपेक्षित आहे ?

**श्री. देवेंद्र फडणवीस (११-०९-२०१७) :** (१) व (२) केंद्र शासनाच्या Regional Connectivity Scheme (RCS) योजनेंतर्गत महाराष्ट्रात नाशिक-ओझर येथील विमानतळावरुन प्रवासी विमान वाहतूक सेवा ऑक्टोबर, २०१७ पासून सुरु करण्याचे नियोजन आहे.

(३) होय.

(४) याबाबतची कार्यवाही सुरु आहे.

(५) व (६) केंद्र शासनाच्या Regional Connectivity Scheme (RCS) योजनेअंतर्गत नाशिक (ओझर) येथील विमानतळावरुन प्रवासी विमान वाहतूक ऑक्टोबर, २०१७ पासून सुरु करण्याचे नियोजन आहे.

---

## राज्यात रजेवर असलले ६७३ कैदी फरार असल्याबाबत

**(२९) ३२०३८ (११-०८-२०१७). ॲड.जयदेव गायकवाड, आर्कि.अनंत गाडगीळ :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यात रजेवर असलेले ६७३ कैदी फरार असल्याचे माहे एप्रिल, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, सदर फरार कैद्यांचा तपास करुन त्यांना पुन्हा अटक करणेबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. देवेंद्र फडणवीस (१९-०९-२०१७) :** (१) राज्यातील कारागृहातून दिनांक ३०/०४/२०१७ रोजी एकूण ६६३ बंदी संचित व अभिवचन रजेवरुन फरार होते.
(२) फरार बंदी पुन्हा कारागृहात दाखल करणेकरिता त्यांचेविरुध्द दिनांक १९/०७/२०१३ पासून भा.दं.वि. कलम २२४ अंतर्गत गुन्हा दाखल करणेची कार्यवाही तसेच सन २०१६ पासून फरार बंद्याचे, छायाचित्रे/माहिती स्थानिक वर्तमानपत्रात प्रसिध्द केली आहे. तसेच पोलीस व कारागृह विभागाचे संकेतस्थळावर फरार बंद्याबाबत माहिती प्रसिध्द करण्यात आली आहे.
(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## धारावी (मुंबई) येथील शासनाच्या जागेतील बालवाडीची जागा बळकावून तेथे एक मजली घर उभारण्यात येत असल्याबाबत

**(३०) ३२२६२ (११-०८-२०१७). डॉ.(श्रीमती) नीलम गोऱ्हे :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) धारावी (मुंबई) येथील गोपीनाथ कॉलनी क्र. १ मधील शासनाच्या जागेतील बालवाडीची जागा बळकावून तेथे एक मजली घर उभारण्यात येत असल्याचे माहे मे, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, तीन महिन्यापूर्वी याच परिसरातील एस.एम.चाळी येथील शासनाच्या जागेतील शौचालय तोडून त्या जागेवरच घर बांधल्याचे निदर्शनास आले आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, त्यात काय आढळून आले, तद्नुसार संबंधित दोषीवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे, तसेच अशा घटना घडू नयेत म्हणून कोणत्या उपाययोजना केल्या आहेत,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. देवेंद्र फडणवीस (१९-०९-२०१७) :** (१) हे खरे नाही.

सदर ठिकाणी तळमजल्यावर बालवाडी कार्यरत असून, पहिल्या मजल्याचे वाढीव बांधकाम करण्यात आले आहे.

(२) हे खरे नाही.

सदर ठिकाणी शौचालयासमोर असलेल्या बृहन्मुंबई महानगरपालिकेच्या जागेवरील झोपडीतील रहिवाशांनी तळमजल्याव्यतिरिक्त पहिला व दुसऱ्या मजल्याचे वाढीव बांधकाम केलेले आहे.

(३) व (४) सदर अनधिकृत वाढीव बांधकामांस महानगरपालिकेमार्फत महाराष्ट्र झोपडपट्टी (सुधारणा, निर्मुलन व पुनर्विकास) अधिनियम १९७१ चे कलम ३ झेड १(४) अन्वये कारणे दाखवा नोटीस व अनधिकृत बांधकाम पाडण्याचा अंतिम आदेश बजावण्यात आला आहे.

सदर प्रकरणी महानगरपालिकेमार्फत पुढील कार्यवाही सुरु आहे.

---

## भाषा साहित्य-संस्कृती यावर खर्च करण्याबाबत

**(३१) ३२२६३ (११-०८-२०१७). प्रा.अनिल सोले, श्री.नागोराव गाणार, श्री.गिरीशचंद्र व्यास :** सन्माननीय **मराठी भाषा मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) भाषा साहित्य-संस्कृती यावर राज्याच्या अंदाजपत्रकाच्या रक्कमेच्या एकूण किती टक्के खर्च करण्याचे धोरण आहे,

(२) असल्यास, अंदाजपत्रकाच्या किती टक्के खर्च करण्यात आला वा येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. विनोद तावडे (१४-०९-२०१७) :** (१) मराठी भाषा साहित्य-संस्कृती विषयक उपक्रमांवर खर्च करण्यासाठी या विभागाच्या अधिपत्याखालील क्षेत्रिय कार्यालयांकडून प्रस्तावित करण्यात येणाऱ्या मागणीनुसार अर्थसंकल्पिय अंदाजात तरतूद करण्यात येते. राज्याच्या अंदाजपत्रकाच्या तुलनेत टक्केवारीचे विहित प्रमाण ठरविण्यात आलेले नाही.
(२) वित्त विभागाकडून वेळोवेळी निश्चित करण्यात येणाऱ्या निधी वितरणाच्या मर्यादेनुसार या विभागाकडून मराठी भाषा आणि साहित्यविषयक उपक्रमांवर खर्च करण्यात येतो.
(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

**ग्रंथालयीन कर्मचाऱ्यांना वेतनश्रेणी व सेवा शर्ती लागू करण्याबाबत**

**(३२) ३२४५५ (११-०८-२०१७). श्री.जयंत पाटील, श्री.बाळाराम पाटील : तारांकित प्रश्न क्रमांक २२१०० ला दिनांक २१ जुलै, २०१६ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **उच्च व तंत्र शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यातील सुमारे ११९३२ शासन मान्य ग्रंथालये कार्यरत असून ग्रंथालयामध्ये २० हजार ग्रंथालयीन कर्मचारी कार्यरत आहेत, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, याबाबत संबंधित कर्मचाऱ्यांनी दिनांक २९ मे, २०१७ रोजी वा त्यासुमारास आंदोलन करून ग्रंथालयीन सेवकांना वेतनश्रेणी व सेवाशर्तीची अट लागू करण्याबाबत मागणी केली आहे, हे खरे आहे काय,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन ग्रंथालयीन सेवकांनी मागणी केल्यानुसार संबंधित सेवकांना वेतनश्रेणी व सेवाशर्ती लागू करण्यासंदर्भात कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. विनोद तावडे (१२-०९-२०१७) :** (१) राज्यात दिनांक ३१ मार्च, २०१७ अखेर १२,१४५ शासनमान्य सार्वजनिक ग्रंथालये आहेत. या ग्रंथालयांमध्ये सुमारे २१,६०६ कर्मचारी मानधनावर कार्यरत आहेत.
(२) राज्यातील सार्वजनिक ग्रंथालय सेवकांना वेतनश्रेणी व सेवाशर्ती व इतर मागण्यासंदर्भात दिनांक २३/०५/२०१७ चे निवेदन प्राप्त झालेले आहे.
(३) मा.मंत्री, उच्च व तंत्र शिक्षण विभाग यांच्या अध्यक्षतेखाली राज्यातील ग्रंथालय संघाचे पदाधिकारी यांचे समवेत दिनांक १४/०७/२०१६ रोजी झालेल्या बैठकीत ग्रंथालयांच्या सेवकांना वेतनश्रेणी देणे शक्य नसल्याचे स्पष्ट करण्यात आले आहे.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## मुंबई-गोवा महामार्ग चौपदरीकरणाच्या कामाकरीता वृक्षतोड करण्यात येत असल्याबाबत

**(३३) ३२४९८ (०७-०८-२०१७). श्री.अमरिशभाई पटेल, श्री.संजय दत्त :** सन्माननीय **सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम वगळून) मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) मुंबई-गोवा महामार्ग चौपदरीकरणाच्या कामांकरीता ३१ हजार झाडे तोडण्यात येणार असल्याचे माहे मे, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, या चौपदरीकरणासाठी वृक्षतोडीस वृक्षप्रेमींनी विरोध करत झाडे वाचविण्यासाठी शासनाकडे मागणी केली आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने सदर मार्गातील वृक्षसंवर्धनासाठी तसेच वृक्षलागवडीसाठी कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. चंद्रकांत पाटील (१४-०९-२०१७) :** (१), (२) व (३) मुंबई गोवा हया राष्ट्रीय महामार्गाच्या पनवेल ते झाराप या ४५०.०० कि.मी. भागाचे चौपदरीकरण रस्ते वाहतूक व महामार्ग मंत्रालयाने विविध पॅकेज मध्ये हाती घेतले असून पनवेल ते वाकेड हया ३३२ कि.मी. लांबीमधील चौपदरीकरण होणार आहेत. त्यापैकी पनवेल ते इंदापूर चा ८४.०० कि.मी. लांबीतील चौपदरीकरणामध्ये १०५०९ झाडे बाधित होणार असून करारनाम्यातील तरतूदीनुसार तोडलेल्या झाडांच्या ३ पट झाडे लावण्यात येणार असल्याचे प्रकल्प संचालक, भारतीय राष्ट्रीय राजमार्ग प्राधिकरण, पनवेल हयांनी कळविले आहे.

इंदापूर ते वाकेड हया २४८ कि.मी लांबीत चौपदरीकरणामध्ये सुमारे ६८,३०० झाडे बाधित होणार आहेत. मा.मंत्री, रस्ते वाहतूक व महामार्ग यांनी दिनांक १७/०४/२०१७ च्या आढावा बैठकीत मुंबई-गोवा महामार्गाच्या चौपदरीकरणामध्ये बाधित होणाऱ्या झाडांचे प्रायोगिक तत्वावर पुनर्रोपण करण्याच्या सूचना दिल्या होत्या. त्यानुसार आरवली ते वाकेड या ९१ कि.मी. लांबीमधील सुमारे १६००० झाडे पुनर्रोपण करण्यासाठी ई-निविदा मागविण्यात आल्या होत्या, परंतु त्यास प्रतिसाद न मिळाल्याने पुढील कार्यवाही प्रगतीत आहे. रस्त्याच्या चौपदरीकरणाच्या कामात एकूण रस्त्याच्या हद्दीतील (Row) झाडांऐवजी रस्त्याच्या भरावाच्या Toe line पर्यंत येणाऱ्या झाडांची गणना करुन, त्यानुसार कमीतकमी झाडांची हानी होऊन जास्तीत जास्त झाडे वाचविण्याचा प्रयत्न करण्यात येत आहे.

(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## नागपूर येथील शासकीय निवासस्थानातून काडतुसांचा मोठा साठा हस्तगत करण्यात आल्याबाबत

**(३४) ३२५९५ (११-०८-२०१७). श्री.अमरिशभाई पटेल, श्री.संजय दत्त :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) नागपूर येथील शासकीय निवासस्थानातून काडतुसांचा मोठा साठा हस्तगत करण्यात आल्याचे माहे जून, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, त्यात काय आढळून आले, तद्नुसार सदरील प्रकरणातील आरोपींवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. देवेंद्र फडणवीस (०७-०९-२०१७) :** (१) हे खरे आहे.
(२) पोलीस स्टेशन धंतोली यांनी सदर प्रकरणी पंचनामा करुन बेवारस असलेले ०.२२ राऊंडचे १०१० खाली केस व ३३० जिवंत राउंड अंदाजे ११६५ रु. किंमतीचे जप्त केले आहेत. अज्ञात आरोपीविरुध्द गुरनं.३०४६/१७ कलम ५, २७ भारतीय शस्त्र अधिनियम अन्वये गुन्हा दाखल करण्यात आला असून पोलीस तपास सुरु आहे.
(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## वसई तालुक्यातील आस्थापनांचे फायर ऑडिट करण्याबाबत

**(३५) ३२८११ (११-०८-२०१७). श्री.प्रविण दरेकर :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) वसई तालुक्यातील काही खाजगी अथवा सार्वजनिक दुकाने, आस्थापनांचे फायर ऑडिटच झाले नसल्याचे माहे जून, २०१६ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, नुकतेच वसई (पूर्व) येथील नेमिनाथ इंडस्ट्रीजला लागलेल्या आगीत कोटयवधीचे नुकसान झाल्याची घटना ताजी असतानाही तसेच वसई-विरारची वाढती लोकसंख्या लक्षात घेऊन फायर ऑडिट होणे गरजेचे असून याकडे प्रशासनाचे दुर्लक्ष होत आहे, हे ही खेर आहे काय,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करून कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. देवेंद्र फडणवीस (१८-०९-२०१७) :** (१) हे अंशत: खरे आहे.
(२) व (३) अग्निशमन व आणिबाणी सेवा विभागामार्फत महाराष्ट्र आग प्रतिबंधक व जीवसंरक्षक उपाययोजना अधिनियम २००६ नुसार फायर ऑडीट करुन घेण्याची कार्यवाही वसई-विरार महानगरपालिकेच्या प्रशासनाकडून करण्यात येत आहे.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

**राज्य शासनाने नव्याने तयार केलेल्या फेरीवाला धोरणाची अंमलबजावणी करण्याबाबत**

**(३६) ३२८३१ (११-०८-२०१७). श्री.प्रविण दरेकर :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्य शासनाने नव्याने तयार केलेल्या फेरीवाला धोरणाची अंमलबजावणी करण्यात आली आहे काय,
(२) असल्यास, त्याचे सर्वसाधारण स्वरूप काय आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. देवेंद्र फडणवीस (१९-०९-२०१७) :** (१), (२) व (३) केंद्र शासनाने दिनांक १ मे, २०१४ पासून पथविक्रेता (उपजीविका संरक्षण आणि पथविक्रीचे विनियमन) अधिनियम २०१४ लागू केला आहे.

सदर अधिनियमातील कलम ३६(१) नुसार राज्य शासनाने महाराष्ट्र पथविक्रेता (उपजीविका संरक्षण व पथविक्री विनियमन) (महाराष्ट्र) नियम २०१६, दिनांक ३ ऑगस्ट, २०१६ रोजी नियमावली व कलम ३८(१) नुसार दिनांक ९ जानेवारी, २०१७ रोजी पथविक्रेता (उपजीविकेचे संरक्षण व पथविक्री विनियमन) २०१७ योजना प्रसिध्द केली आहे.

सदर योजनेतील तरतुदीनुसार महानगरपालिकेमार्फत पुढील कार्यवाही करण्यात येत आहे.

---

**राज्यातील शिधापत्रिकांच्या आधार सिडींगचे काम पूर्ण करण्याबाबत**

**(३७) ३२८७८ (११-०८-२०१७). डॉ.अपूर्व हिरे : तारांकित प्रश्न क्रमांक २९३५४ ला दिनांक २० मार्च, २०१७ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **अन्न व नागरी पुरवठा आणि ग्राहक संरक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राष्ट्रीय अन्न सुरक्षा अधिनियम अंतर्गत राज्यातील शिधापत्रिकाधारक ७ कोटी १६ हजार लाभार्थ्यांपैकी ६.१० कोटी लाभार्थ्यांचे आधार सिडींग पुर्ण झाले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उर्वरित १ कोटी ६ हजार लाभार्थ्यांची आधार सिडींगची प्रगतीपथावर असलेली कार्यवाही पुर्ण झाली आहे काय,

(३) नसल्यास, शिधापत्रिकाधारक लाभार्थ्यांची आधार सिडींगची कार्यवाही अद्यापपर्यंत पुर्ण न होण्याची कारणे काय आहेत व सदरील कार्यवाही केव्हापर्यंत पुर्ण होणे अपेक्षित आहे ?

**श्री. गिरीश बापट (११-०९-२०१७) :** (१) होय.

(२) व (३) आधार सिडींगकरिता एनआयसी, दिल्ली यांच्याकडून उपलब्ध करुन देण्यात आलेली संगणक प्रणाली तांत्रिक कारणामुळे सप्टेंबर, २०१६ ते फेब्रुवारी, २०१७ या कालावधीत बंद होती. आता मार्च, २०१७ पासून ePDS-DCS ही संगणक प्रणाली उपलब्ध झाली असून त्यामध्ये आधार सिडींगचे काम सुरु आहे. केंद्र शासनाच्या आदेशानुसार प्रत्येक लाभार्थ्यांने त्यांचे आधार क्रमांक शासनास शिधापत्रिका Databaseमध्ये सिडींग करण्यासाठी ३० सप्टेंबर, २०१७ पर्यंत देणे आवश्यक आहे. त्यामुळे विहित मुदतीत कार्यवाही पूर्ण करण्यात येणार आहे.

---

**मराठी भाषा धोरणाचा मसुदा अंतिम करण्याबाबत**

**(३८) ३२८८० (११-०८-२०१७). डॉ.अपूर्व हिरे : तारांकित प्रश्न क्रमांक २६९७० ला दिनांक १ एप्रिल, २०१७ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **मराठी भाषा मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मराठी भाषेच्या विकासासाठी स्थापित व दिनांक ५ ऑगस्ट, २०१५ च्या शासन निर्णयान्वये पुर्नरचित भाषा सल्लागार समितीकडून मराठी भाषा धोरणाचा मसुदा अंतिम करण्याची सुरु असलेली कार्यवाही पुर्ण झाली आहे काय,

(२) असल्यास, उक्त मराठी भाषा धोरण मसुद्याचे संक्षिप्त स्वरुप काय आहे,

(३) नसल्यास, मराठी भाषा धोरणाचा मसुदा अंतिम करण्याबाबतची कार्यवाही केव्हापर्यंत पुर्ण होणे अपेक्षित आहे ?

**श्री. विनोद तावडे (१३-०९-२०१७) :** (१), (२) व (३) भाषा सल्लागार समितीने भाषा धोरणाचा मसुदा शासनास सादर केला असून सदर मसुद्यामध्ये शिक्षण, उद्योग, न्यायालय, व्यापार व वाणिज्य संस्था इत्यादी विविध क्षेत्रात मराठीचा प्रभावी वापर होण्याच्या दृष्टीने शिफारशी करण्यात आल्या आहेत. सदर मसुद्याच्या अनुषंगाने धोरणात्मक निर्णय घेण्याच्या दृष्टीने पुढील कार्यवाही सुरू आहे.

---

## सर जे.जे.कला महाविद्यालय मुंबई येथील अध्यापकांची पदे रिक्त असल्याबाबत

**(३९) ३२८८१ (११-०८-२०१७). डॉ.अपूर्व हिरे : तारांकित प्रश्न क्रमांक २३८६१ ला दिनांक ९ डिसेंबर, २०१६ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **उच्च व तंत्र शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) सर जे.जे.कला महाविद्यालय मुंबई येथील अध्यापकांची ३३ पदे नियमित स्वरुपात भरण्याच्या अनुषंगाने महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडे मागणीपत्र पाठविण्यात आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, कला शाखेतील विद्यार्थ्यांचे शैक्षणिक नुकसान होवू नये, तसेच शिक्षणाचा दर्जा खालावू नये, यानुषंगाने हंगामी व कंत्राटी ऐवजी नियमित स्वरुपात सदरील पदे भरण्यासंदर्भात पुढे कोणता निर्णय घेण्यात आला व कोणती कार्यवाही करण्यात आली आहे,

(३) तसेच शासकीय कला महाविद्यालय, औरंगाबाद येथे मंजुर २५ अध्यापकीय पदांपैकी १६ अधिव्याख्याता हंगामी व कंत्राटी हंगामी स्वरुपात

कार्यरत असून ७ जागा रिक्त असल्याने सदरील पदे तात्पुरत्या स्वरुपात न भरता ती कायमस्वरुपी भरण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विद्यार्थ्यांच्या शैक्षणिक हिताच्यादृष्टीने सदरील पदे नियमित स्वरुपात भरण्याबाबतची कार्यवाही केव्हापर्यंत पुर्ण होणे अपेक्षित आहे ?

**श्री. विनोद तावडे (१३-०९-२०१७) :** (१) होय,
(२) व (३) जे.जे.कला महाविद्यालयासह इतर ३ शासकीय कला महाविद्यालयातील अध्यापकीय पदे नियमित स्वरुपात भरण्याकरीता महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडे मागणी पत्र पाठविण्यात आले आहे. महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत प्राध्यापकांची ८ पदे व अधिव्याख्यात्यांची ६५ पदे भरण्याकरीता जाहिरात प्रसिध्द करण्यात आली असून म.लो.आ.मार्फत काही विभागांचे मुलाखतीचे आयोजन करण्यात आले आहे.
(४) शासकीय कला महाविद्यालयातील गट-अ संवर्गातील पदे ही महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या कार्यकक्षेतील असल्याने, त्यानुसार संबंधित रिक्त पदे सरळसेवेने भरण्यासाठी महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडे मागणीपत्र पाठविले जाते. त्यानुषंगाने विहित पध्दतीने निवडप्रक्रीया राबविणे, उमेदवारांची शिफारस करणे ही कार्यवाही पूर्णत: महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या कार्यकक्षेतील बाब आहे.

---

## राज्यातील अकृषि विद्यापीठे व संलग्नित उच्च व तंत्र शिक्षण विभागाच्या नियंत्रणाखालील महाविद्यालयातील प्राचार्यांना सुधारित वेतनश्रेणी देण्याबाबत

**(४०) ३२८८२ (११-०८-२०१७). डॉ.अपूर्व हिरे : तारांकित प्रश्न क्रमांक ३०१९४ ला दिनांक २० मार्च, २०१७ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **उच्च व तंत्र शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) अकृषि विद्यापीठे व संलग्नित उच्च व तंत्र शिक्षण विभागाच्या नियंत्रणाखालील महाविद्यालयातील प्राचार्यांचे किमान वेतन विद्यापीठ अनुदान आयोगाच्या शिफारशीनुसार रुपये ४३,०००/- करण्याबाबतच्या प्रस्तावावर वित्त विभागाने दिलेल्या अभिप्रायानुसार प्राचार्य पदांसाठी

अनुभवाच्या अटींच्या मुद्यांवर विद्यापीठ अनुदान आयोगाचे अभिप्राय मागविण्यात आले आहेत, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, विद्यापीठ अनुदान आयोगाने दिलेले अभिप्राय अप्राप्त आहेत, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन सदरील अभिप्राय प्राप्त करून घेण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. विनोद तावडे (२२-०९-२०१७) :** (१) होय. हे खरे आहे.
(२) होय, विद्यापीठ अनुदान आयोगाचे अभिप्राय अद्याप अप्राप्त आहेत.
(३) प्रकरणी शासनाच्या दिनांक ४ मे, २०१६ व दिनांक १ ऑगस्ट, २०१६ तसेच दिनांक २३/०८/२०१७ च्या पत्रान्वये विद्यापीठ अनुदान आयोगाकडून अभिप्राय मागविण्यात आलेले आहेत.
(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## दि प्रोजेक्ट ऑफ कॉप्रेहेन्सिव्ह मराठी-इंग्लिश डिक्शनरीचे काम पुर्ण करण्याबाबत

**(४१) ३३१४५ (११-०८-२०१७). श्री.नागोराव गाणार, प्रा.अनिल सोले :** सन्माननीय **मराठी भाषा मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) नागपूर येथील दि प्रोजेक्ट ऑफ कॉप्रेहेन्सिव्ह मराठी-इंग्लिश डिक्शनरी या पुस्तकाचे काम निधी अभावी बंद असल्याचे माहे एप्रिल, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे काय,
(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. विनोद तावडे (२१-०९-२०१७) :** (१) व (२) अंशत: खरे आहे.

"दि प्रोजेक्ट ऑफ कॉप्रेहेन्सिव्ह मराठी-इंग्लिश डिक्शनरी" हा प्रकल्प नागपूर येथील नसून सदर प्रकल्प केंद्र शासनाच्या मनुष्यबळ विकास

मंत्रालयाच्या अखत्यारित असलेल्या "भारतीय भाषा संस्थान, मैसुर" यांच्याकडे सुरू आहे. भारतीय भाषा संस्थान, मैसुर या संस्थेचे महाराष्ट्र राज्यातील विभागीय कार्यालय "पश्चिम विभागीय भाषा केंद्र" हे डेक्कन कॉलेज, पुणे येथे कार्यरत असून या कार्यालयामार्फत सदर प्रकल्पाचे काम सुरू आहे.

सदर प्रकल्प ख्यातनाम भाषा वैज्ञानिक डॉ. अशोक केळकर यांच्या संकल्पनेतून साकारला असून या शब्दकोशाचे काम केंद्र शासनाच्या अखत्यारितील पश्चिम विभागीय भाषा केंद्र, डेक्कन कॉलेज, पुणे या कार्यालयाकडून सन २०१० साली सुरू झाले आणि चार वर्षे काम झाल्यावर हे काम सन २०१४ मध्ये बंद पडले. याबाबतचे वृत्त दैनिक महाराष्ट्र टाईम्स या वृत्तपत्राच्या पुणे आवृत्तीमध्ये दिनांक २७ डिसेंबर, २०१५ रोजी प्रकाशित झाले. सदर लेखाच्या अनुषंगाने सदर प्रकल्प पूर्ण करण्यासाठी नेमक्या कोणत्या अडचणी आहेत याची माहिती राज्य मराठी विकास संस्थेकडून घेण्यात आली. सदर प्रकल्पाचे उर्वरित काम पूर्ण करून घेण्यास राज्य मराठी विकास संस्था तयार असून, त्यादृष्टीने सदर दोन्ही संस्थांच्या प्रमुखांमध्ये परस्पर चर्चा होऊन यासंबंधीचा प्रस्ताव राज्य मराठी विकास संस्थेकडे सोपविण्याबाबत निर्णय झाला. सदर प्रकल्पाचे काम सुरू होण्यासाठी भारतीय भाषा संस्थान, मैसुर यांचे "ना-हरकत प्रमाणपत्र" राज्य मराठी विकास संस्थेला प्राप्त होणे आवश्यक आहे आणि याबाबतची कार्यवाही पश्चिम विभागीय भाषा केंद्र, डेक्कन कॉलेज, पुणे यांच्याकडे सुरू आहे. सदर "ना-हरकत पत्र" प्राप्त झाल्यानंतर दोन्ही संस्थामध्ये विहित करारपत्र करून प्रत्यक्ष प्रकल्पाचे काम हाती घेण्यात येईल.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

**राज्याचे पोलीस दलात श्वानांची भरती करण्याबाबत**

**(४२) ३३१६२ (११-०८-२०१७). श्री.नागोराव गाणार, प्रा.अनिल सोले :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्याचे पोलीस दल अधिक सक्षम व्हावे यासाठी पोलीस दलात १८१ श्वानांची भरती करण्यात येत असल्याचे माहे मे, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. देवेंद्र फडणवीस (११-०९-२०१७) :** (१) होय, हे खरे आहे.

गृह विभागाच्या दिनांक २६/०५/२०१७ च्या शासन निर्णयान्वये राज्यातील विविध पोलीस घटकांकरिता १८१ श्वान खरेदीस मान्यता दिलेली आहे.

(२) महाराष्ट्रातील विविध पोलीस घटकांकडून माहे ऑगस्ट, २०१७ अखेर पर्यंत ७१ श्वान खरेदी करण्यात आलेली आहे. तसेच मोठ्या प्रमाणामध्ये चांगल्या जातीचे उत्तम व सदृढ श्वान कमी कालावधीमध्ये उपलब्ध होणे शक्य नसल्याने इतर पोलीस घटकांकडून टप्प्याटप्याने श्वान खरेदी करण्याची प्रक्रिया चालू आहे.

(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## सोलापूर-मुंबई मुख्य मार्गापासून टेंभुर्णी ते लातूर व तुळजापूर-लातूर-नांदेड या रस्त्यांच्या चौपदरीकरणाबाबत

**(४३) ३३६१३ (०७-०८-२०१७). श्री.विक्रम काळे, श्री. अमरसिंह पंडित, श्री. सतिश चव्हाण, डॉ. सुधीर तांबे, श्री. दत्तात्रय सावंत :** सन्माननीय **सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम वगळून) मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) सोलापूर-मुंबई मुख्य मार्गापासून टेंभुर्णी ते लातूर व तुळजापूर-लातूर-नांदेड या रस्त्यांच्या चौपदरीकरण कामास शासनाने मंजूरी दिली, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, मंजूरी दिलेल्या कामाचे स्वरुप काय आहे,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने रस्त्यांच्या चौपदरीकरणाबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. चंद्रकांत पाटील (१३-०९-२०१७) :** (१), (२) व (३) केंद्र शासनाच्या रस्ते, वाहतूक व महामार्ग मंत्रालयाने राष्ट्रीय महामार्ग ३६१ च्या तुळजापूर-लातूर (वारंगा फाटा) हया २४४ कि.मी.रस्त्याच्या चौपदरीकरणास मंजूरी दिली असून हया महामार्गाचे तुळजापूर ते औसा (५५ कि.मी.), औसा ते चाकूर (६५.०० कि.मी.), चाकूर ते लोहा (६२ कि.मी.) व लोहा ते वारंगा फाटा (६८ कि.मी.) अशा ४ भागात विभागणी केली असून सध्या भूसंपादनाची कार्यवाही अंतिम टप्प्यात आहे. तुळजापूर ते औसा हया ५५ कि.मी. महामार्गाचे भूसंपादन ९९ टक्के झाल्याने चौपदरीकरणासाठी करारनामा करण्यात आला आहे. इतर तीन पॅकेजसाठी भूसंपादन पूर्ण झाल्यावर निविदा बोलविण्यात येणार आहे, असे प्रकल्प संचालक, भारतीय राष्ट्रीय राजमार्ग प्राधिकरण, नांदेड यांनी कळविले आहे.

केंद्र शासनाने दिनांक ०३/०१/२०१७ च्या अधिसुचनेनुसार घोषित केलेल्या सातारा ते बैतुल हया राष्ट्रीय महामार्ग ५४८ मध्ये टेंभुर्णी-बार्शी-कुसलंब ही लांबी तसेच कुसलंब ते सगरोली हया राष्ट्रीय महामार्ग ६३ मध्ये कुसलंब ते लातूर ही लांबी समाविष्ट आहे.

टेंभुर्णी ते लातूर हया १६५ कि.मी. रस्त्याचे पेव्हड शोल्डरसह दुपदरीकरण करण्यासाठी सविस्तर प्रकल्प अहवाल महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळाने केंद्र शासनास मंजुरीसाठी सादर केला असून अदयाप मंजुरी अप्राप्त आहे.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## उमरगा (उस्मानाबाद) येथील तालुका कृषी अधिकाऱ्यांसह कर्मचाऱ्यांची पदे रिक्त भरण्याबाबत

**(४४) ३३७०५ (०७-०८-२०१७). श्री.सुजितसिंह ठाकूर :** सन्माननीय **कृषी मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) उमरगा (जि.उस्मानाबाद) येथील तालुका कृषी अधिकाऱ्यांसह कर्मचाऱ्यांची पदे रिक्त असल्याचे निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, तालुका कृषी अधिकारी कार्यालयात कृषी अधिकारी, मंडळ

अधिकारी, पर्यवेक्षक, वरिष्ठ लिपिक ही पदे रिक्त असल्याने एकाच व्यक्तीवर कामाचा भार पडत आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व तद्नुसार रिक्त पदे भरण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. पांडुरंग फुंडकर (११-०९-२०१७) :** (१) हे अंशत: खरे आहे.

तालुका कृषि अधिकारी कार्यालय, उमरगा व अधिनस्त कार्यालयामध्ये ५० मंजूर पदापैकी ३९ पदे भरलेली असून ११ पदे रिक्त आहेत.

(२) हे खरे नाही.

५ रिक्त पदांचा अतिरिक्त कार्यभार अन्य ५ अधिकारी /कर्मचाऱ्यांकडे सोपविण्यात आलेला आहे. त्यामूळे रिक्त पदांचा भार एकाच व्यक्तीवर पडत आहे, अशी वस्तुस्थिती नाही.

(३) महाराष्ट्र कृषि सेवा, गट-ब (कनिष्ठ) संवर्गातील सरळसेवेच्या कोटयातील ५० उमेदवारांची निवडयादी महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडून प्राप्त झालेली असून त्यांना नियुक्ती देण्याची कार्यवाही सुरु आहे. तसेच आणखी ७९ रिक्त पदांचे मागणीपत्र दिनांक ३०/०३/२०१७ रोजीच्या शासन पत्रान्वये महाराष्ट्र लोकसेवा आयोगास पाठविण्यात आले आहे.

तसेच या संवर्गातील पदोन्नतीच्या कोटयातील १०२ रिक्त पदे पदोन्नतीने भरण्याची कार्यवाही अंतिम टप्प्यावर आहे.

क्षेत्रिय स्तरावरील कृषि सहाय्यक संवर्गाची पदे भरण्यासाठी ७३० पदे विज्ञापित करण्यात आली होती. तथापि सदर पदासाठीची निवडयादी रद्द करण्यात आली आहे. यामुळे सदर पदे भारांकन पध्दतीने भरण्याबाबत शासन निर्णय, दिनांक १७/०३/२०१७ नुसार कार्यवाही कार्यान्वित होती. तथापि, सध्या प्रकरण न्यायप्रविष्ठ असल्याने ती भरता आलेली नाहीत. शासन निर्णय दिनांक ०२/०६/२०१५ व दिनांक १५/०१/२०१६ नुसार या संवर्गातील आदिवासी क्षेत्रातील व क्षेत्राबाहेरील रिक्त पदे भरण्याबाबतही विभागीय कृषि सहसंचालक यांना दिनांक १२/०७/२०१७ रोजीचे पत्रान्वये निर्देश देण्यात आलेले आहेत.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यात माध्यमिक शाळेतील समुपदेकांना विशेष प्रोत्साहन भत्ता तसेच ग्रेड पे देण्याबाबत

**(४५) ३३९६७ (११-०८-२०१७). श्री.श्रीकांत देशपांडे, श्री.दत्तात्रय सावंत : तारांकित प्रश्न क्रमांक २९५२८ ला दिनांक २० मार्च, २०१७ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) पाचव्या वेतन आयोगांतर्गत वेतनश्रेणी लागू करतांना माध्यमिक शाळेतील समुपदेशकांना रुपये २००/- चे विशेष वेतन मान्य करण्यात आले होते, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सहावा वेतन आयोग अंमलात आणताना समुपदेशकांना विशेष वेतन अथवा वरचा ग्रेड पे देण्यात आला नसून माध्यमिक शाळेतील विशेष वेतन घेणाऱ्या पर्यवेक्षक पदावरील शिक्षकांना सहाव्या वेतन आयोगाच्या वेळी वरचा ग्रेड पे देण्यात आला, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन पर्यवेक्षक पदावरील शिक्षकांप्रमाणे ५३९ समुपदेशकांना ग्रेड पे देण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. विनोद तावडे (२५-०९-२०१७) :** (१) होय.

(२) व (३) होय, सहाव्या वेतन आयोगानुसार पर्यवेक्षक व समुपदेशक यांच्या ग्रेड वेतनामध्ये तफावत आहे. तथापि, सहावा वेतन आयोग लागू करतांना कोणत्याही संवर्गाला विशेष वेतन अनुज्ञेय ठरविले नाही.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## दिनांक १९ सप्टेंबर, २०१६ च्या शासन निर्णयात सुधारणा करण्याबाबत

**(४६) ३४०७४ (१८-०८-२०१७). श्री.श्रीकांत देशपांडे, श्री.दत्तात्रय सावंत :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) शासन निर्णय दिनांक १५ नोव्हेंबर, २०११ नुसार विना अनुदानित शाळांना अनुदानाकरिता पात्र/अपात्र ठरविण्यात येत असून मंत्रिमंडळाच्या

दिनांक १४ जून, २०१६ च्या बैठकीमध्ये मूल्यांकनाच्या निकषानुसार पात्र ठरलेल्या १६२८ शाळा व २४५२ तुकड्यांना अनुदान मंजूर केले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सर्व प्रकारच्या निकषांची अटी-शर्तीची पूर्तता केलेल्या शाळांना त्या पुन्हा अनुदानास अपात्र ठरतील अशा कोणत्याही नव्या अटी अंतर्भूत करता येतील काय,

(३) असल्यास, नव्या अटींमुळे शाळा अपात्र ठरल्यास, शाळांचे अनुदान धोरण, मुल्यांकन प्रक्रिया व मंत्रिमंडळाच्या निर्णयावर प्रश्नचिन्ह निर्माण होईल, हे खरे आहे काय,

(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन दिनांक १९ सप्टेंबर, २०१६ च्या शासन निर्णयात सुधारणा करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. विनोद तावडे (१८-०९-२०१७) :** (१) मंत्रिमंडळाच्या दिनांक ३० ऑगस्ट, २०१६ च्या बैठकीतील निर्णयानुसार, दिनांक १४ जून, २०१६ पूर्वी अनुदानास पात्र घोषित करण्यात आलेल्या प्राथमिक व माध्यमिक शाळांना शासन निर्णय दिनांक १९ सप्टेंबर, २०१६ अन्वये २० टक्के प्रमाणे अनुदान मंजूर करण्यात आले.

(२), (३) व (४) दिनांक १९ सप्टेंबर, २०१६ च्या शासन निर्णयात, शैक्षणिक गुणवत्ता राखण्याच्या दृष्टीने आवश्यक अटी व शर्ती विहित करण्यात आल्या आहेत.

(५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## वाशी, नवी मुंबई येथील रेल्वे स्थानकासमोरील आयटी पार्कच्या भूखंडाचा दुरुपयोग होत असल्याबाबत

**(४७) ३४२६१ (११-०८-२०१७). प्रा.जोगेन्द्र कवाडे :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) वाशी, नवी मुंबई येथील रेल्वे स्थानकासमोरील आयटी पार्कच्या भूखंडाचा दुरुपयोग होत असून आयटी व्यतिरिक्त व्यापारासाठी त्याचा मोठया प्रमाणात वापर होत असल्याची बाब माहे जून, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, या आयटी पार्कच्या नावावर या भूखंड विकासकाने महापालिका व शासनाकडून सवलती मिळवून घेतल्या आहेत, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उक्त भागातील सर्व आयटी पार्कचे सर्वेक्षण करुन नियमभंग करणाऱ्यांवर शासनाने कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. देवेंद्र फडणवीस (२१-०९-२०१७) :** (१) सदर परिसरामध्ये आयटी वापराव्यतिरिक्त इतर वापर होत असल्याबाबत नवी मुंबई महानगरपालिकेस तक्रारी प्राप्त झाल्या आहेत.

(२) हे खरे नाही.

नवी मुंबई महानगरपालिकेच्या विकास नियंत्रण नियमावलीनुसार अनुज्ञेय बाबी विचारात घेऊन, संबंधितांना बांधकाम परवानग्या देण्यात आल्या आहेत. या व्यतिरिक्त भुखंडाच्या बांधकामांना अतिरिक्त कुठलीही सवलत देण्यात आली नाही.

(३) उक्त भागातील सर्व आयटी पार्कचे सर्वेक्षण महानगरपालिकेच्या अतिक्रमण विभागामार्फत करण्यात आले असून त्याअनुषंगाने संबंधितांवर कारवाईही करण्यात आली आहे. तसेच सदर प्रकरणांमधील काही प्रकरणे न्यायप्रविष्ठ आहेत.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## औरंगाबाद महापालिकेकडे पथदिव्यांची माहिती उपलब्ध नसल्याबाबत

**(४८) ३४३४१ (११-०८-२०१७). श्री.सुभाष झांबड :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) औरंगाबाद महापालिकेच्या सन २०१० ते २०१५ या ५ वर्षाच्या लेखापरिक्षक अहवालानुसार शहरात महापालिकेने एकूण किती पथदिवे लावले याची माहिती महापालिकेकडे नसल्याचे माहे मे, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, या अहवालानुसार अनियमितता करणाऱ्या संबंधित अधिकाऱ्यांवर शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. देवेंद्र फडणवीस (२१-०९-२०१७) :** (१) हे खरे नाही.

औरंगाबाद महानगरपालिका क्षेत्रात महानगरपालिकेने सन २०१० ते २०१५ या कालावधीत एकूण ४८,३९८ पथदिवे लावलेले असल्याचे औरंगाबाद महानगरपालिकेने कळविलेले आहे.

(२) प्रश्न उद्भवत नाही.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

**मुंबई महानगरपालिकेत निकृष्ट दर्जाची कामे होत असल्याबाबत**

**(४९) ३४४७८ (११-०८-२०१७). ॲड.राहुल नार्वेकर :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मुंबई महानगरपालिकेच्या दक्षता विभागाकडे महानगरपालिकेमध्ये होणाऱ्या कामांपैकी (उदा. रस्ते, गटारे, जलवाहिन्या इत्यादी) काही कामे तपासासाठी पाठविली जातात, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, माहे एप्रिल, २०१६ ते मार्च, २०१७ या कालावधीत दक्षता विभागाकडे तपासासाठी पाठविण्यात आलेल्या कामांना योग्य प्रमाणपत्र देताना अटी व नियमांचे उल्लंघन केल्याने विलंब झालेला आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उक्त प्रश्न भाग (२) च्या अनुषंगाने शासनाने चौकशी केली आहे काय, त्याचे निष्कर्ष काय आहेत व त्यात दोषी आढळणाऱ्या व्यक्तिंवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. देवेंद्र फडणवीस (१९-०९-२०१७) :** (१) हे खरे आहे.

(२) सदर कामांच्या बाबतीत बृहन्मुंबई महानगरपालिकेच्या दक्षता विभागामार्फत ना-हरकत प्रमाणपत्र दिले जात नाही.

तथापि, संबंधित विभागाने दक्षता विभागाच्या संयुक्त दरम्यान आढळलेल्या त्रुटी व निरीक्षणांबाबत पूर्तता अहवाल दक्षता विभागास सादर केल्यानंतर त्याची छाननी करुन तसेच आवश्यकतेप्रमाणे यथायोग्य दंड आकारुन किंवा उचित कार्यवाही करुन सदर निरीक्षणे बंद करण्यात येतात.

सदर कामांची तपासणी करुन निरीक्षण अहवाल देणे ही स्वतंत्र प्रक्रिया असून त्याचा कामाच्या प्रगतीशी संबंध नाही. त्यामुळे दक्षता विभागाच्या निरीक्षण अहवालामुळे विकास कामांच्या प्रगतीत कोणत्याही प्रकारचा विलंब झाला आहे हे खरे नाही.

(३) व (४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## बीड शहरातील बिंदुसरा नदीवरील पुलाची झालेली दुरवस्था

**(५०) ३४५०८ (०७-०८-२०१७). श्री.विनायकराव मेटे :** सन्माननीय **सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम वगळून) मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राष्ट्रीय महामार्ग २११ धुळे-सोलापूर या महामार्गावरील बीड शहरातील बिंदुसरा नदीवरील पुलाची दुरवस्था झाल्यामुळे पुल वाहतुकीसाठी धोकादायक झाला आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, या धोकादायक पुलामुळे बिंदुसरा नदीतून काढलेला बाह्यवळण रस्ता माहे जून, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान झालेल्या पावसात वाहून गेला आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने पुलाबाबतचा अहवाल सादर करून नवीन पुलाचे बांधकाम करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. चंद्रकांत पाटील (१३-०९-२०१७) :** (१) पुलाची धारणक्षमता विचारात घेवून भारतीय राष्ट्रीय राजमार्ग प्राधिकरण यांनी पुल जड वाहतूकीसाठी बंद करण्यात आला आहे.

(२) व (३) दिनांक ११/०६/२०१७ रोजी झालेल्या अतिवृष्टीमुळे बाहय वळण रस्त्याच्या क्षतिग्रस्त झालेल्या भागाची तात्काळ पुर्नस्थापना करण्यात आल्याचे तसेच जुना पुल तोडून नविन चौपदरी पुलाचे बांधकाम हाती घेण्यात येत असल्याचे प्रकल्प संचालक, भारतीय राष्ट्रीय राजमार्ग प्राधिकरण, औरंगाबाद यांनी कळविले आहे.

(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

**विधान भवन :**
**नागपूर.**

**डॉ. अनंत कळसे**
**प्रधान सचिव,**
**महाराष्ट्र विधानपरिषद**

---

मुद्रणपूर्व सर्व प्रकिया महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालयाच्या संगणक यंत्रणेवर करण्यात आली आहे.
मुद्रण : शासकीय मुद्रणालय, नागपूर.